






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल ते जून २०१५




प्रा. रंगनाथ पठारे

अंतरंग



अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचा १०९वा वर्धापनदिन समारंभ दि. २७ मे २०१५ रोजी माजी सनदी अधिकारी व लेखक अविनाश धर्माधिकारी यांच्या प्रमुख उपस्थितीत आणि डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. साहित्यक्षेत्रात निरलसपणे काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना या वेळी धर्माधिकारी यांच्या हस्ते पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले. त्याची क्षणचित्रे.



भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना मधू नेने (वाई).



मसापचे ज्येष्ठ कार्यकर्ते राजा फडणीस पुरस्कृत 'मसाप उत्कृष्ट शाखा' फिरता करंडक स्वीकारताना मसाप-सासवड शाखेचे रावसाहेब पवार व विजय कोलते.



मसापचे ज्येष्ठ कार्यकर्ते दिवंगत रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा मसाप कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना श्यामराव पाटील (इस्लामपूर).



मसापचे ज्येष्ठ कार्यकर्ते दिवंगत रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा मसाप कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना पद्माकर कुलकर्णी (सोलापूर).



मसापचा वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिक वितरण कार्यक्रम ज्येष्ठ लेखिका मंगला गोडबोले यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झाला. या वेळी मनोगत व्यक्त करताना गोडबोले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५१, एप्रिल-मे-जून २०१५



संपादक

**महेंद्र मुंजाळ**



संपादक मंडळ

**मनोहर सोनवणे । प्रा. सुजाता शेणई । डॉ. किसन पाटील**
**डॉ. पुरुषोत्तम काळे । नंदा सुर्वे । श्याम जोशी**



सल्लागार संपादक मंडळ

**डॉ. नीलिमा गुंडी । प्रा. रूपाली शिंदे । डॉ. कल्याणी दिवेकर**



प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)












# अंतरंग






मुद्रक-प्रकाशक
प्रकाश पायगुडे
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

संपादकीय संयोजन
संदीप खाडे

अक्षरजुळणी व सजावट
आर्ट ॲडव्हर्टायझिंग

मुखपृष्ठ
जयदीप कडू

मुद्रितशोधन
अशोक देव

मुद्रणस्थळ
पुणे विद्यार्थी गृह
महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना,
सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३५१
एप्रिल-जून २०१५

# संपादकीय



**संपादकीय**
**महेंद्र मुंजाळ**



महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चा अंक क्रमांक ३५१ (एप्रिल-मे-जून २०१५) वाचकांच्या हाती सोपवताना विशेष आनंद होतोय. आमच्या संपादकीय कार्यकाळातला हा तिसरा अंक. गेल्या दोन अंकांप्रमाणेच याही अंकाला वाचक चांगला प्रतिसाद देतील अशी आशा आहे.

या अंकाच्या निमित्ताने दोन गोष्टींवर प्रकाश टाकावासा वाटतो.

एक म्हणजे महाराष्ट्र साहित्य परिषदेचा १०९ वा वर्धापनदिन (२७ मे २०१५). या निमित्ताने दरवर्षी विविध पुरस्कार सन्मानाने प्रदान केले जातात. साहित्य क्षेत्रात दीर्घकाळ योगदान दिलेल्या ज्येष्ठ लेखकाला 'मसाप सन्मान' प्रदान केला जातो. यंदा ज्येष्ठ साहित्यिक रंगनाथ पठारे यांना हा सन्मान देऊन गौरवण्यात आलं. साठोत्तरी काळातले एक महत्त्वाचे प्रयोगशील लेखक म्हणून आपण रंगनाथ पठारे यांना ओळखतो. कथा, कादंबरी, समीक्षा, वैचारिक अनुवाद असे विविध साहित्यप्रकार सशक्तपणे हाताळत पठारे यांनी विपुल लेखन केलं आहे. तीव्र नैतिक भान प्रकट करणारे लेखक म्हणूनही पठारे वाचकांना परिचित आहेत. मानवी संबंधातील अपार कुतूहल त्यांच्या साहित्यनिर्मितीतून व्यक्त झालं आहे. साधारण सत्तरच्या दशकात त्यांच्या कथालेखनाला सुरुवात झाली. त्यानंतर त्यांनी सातत्याने लेखन केलं आहे. कथालेखनात शैली आणि आशयाचे अनेक प्रयोग त्यांनी केले आहेत, म्हणूनच त्यांची कथा समकालीन व पूर्वकालीन मराठी कथेपेक्षा वेगळी ठरली. कथेबरोबरच कादंबरीलेखनातही त्यांनी अनेक प्रयोग केले, त्यामुळे त्यांच्या कादंबऱ्याही बहुचर्चित ठरल्या. बहुपेडी आशयाला अर्थांचे अनेक स्तर देणारी भाषा सजगपणे वापरण्याचं कौशल्य त्यांच्या कादंबऱ्यांतून दिसून येतं. 'ताम्रपट' या त्यांच्या विशेष गाजलेल्या कादंबरीचा इथे उल्लेख करावासा वाटतो. १९४२ ते १९८० या काळातला महाराष्ट्राचा व्यापक सामाजिक-राजकीय पट उलगडणारी ही वास्तववादी कादंबरी मराठी कादंबरी क्षेत्रात मानदंड ठरली. 'साहित्य अकादमी'चा सन्मानही या कादंबरीला मिळाला. कथा-कादंबरीबरोबरच काही महत्त्वाची समीक्षा तसेच वैचारिक लिखाणही त्यांच्या नावावर जमा आहे. 'कलाकृतीची निर्मिती ही एक गंभीर व अर्थपूर्ण प्रक्रिया असते, त्यासाठी लेखकाने जगण्याशी इमान ठेवलं पाहिजे', अशी आपली लेखनविषयक भूमिका मांडणाऱ्या रंगनाथ पठारे यांना प्रतिष्ठेचा 'मसाप सन्मान' देऊन गौरवण्यात आलं. पठारे यांचं मन:पूर्वक अभिनंदन आणि पुढील लेखनकार्यासाठी शुभेच्छा.

याशिवाय, याच कार्यक्रमात वाई (सातारा) परिसरात साहित्यिक-सांस्कृतिक क्षेत्रात महत्त्वपूर्ण योगदान दिलेल्या मधू नेने यांना 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' देऊन सन्मानित करण्यात आलं. याच कार्यक्रमात सासवड परिसरात साहित्यिक-सांस्कृतिक क्षेत्रात दीर्घकाळ योगदान दिलेल्या मसापच्या सासवड शाखेस परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते राजा फडणीस पुरस्कृत 'मसाप उत्कृष्ट शाखा फिरता करंडक' देऊन गौरवण्यात आलं. तसेच आपापल्या परिसरातील साहित्य परिषदेच्या शाखांसाठी निरलसपणे काम करणाऱ्या श्यामराव पाटील (इस्लामपूर) आणि पद्माकर कुलकर्णी (सोलापूर) यांना परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते दिवंगत रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा 'मसाप कार्यकर्ता पुरस्कार' प्रदान करण्यात आला. परिषदेसाठी निःस्पृहपणे काम करणाऱ्या या सर्व कार्यकर्त्यांचं अभिनंदन! परिषदेच्या वर्धापनदिन पूर्वसंध्येला ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कारही प्रदान करण्यात आले. त्यावर याच अंकात मसापच्या कार्यवाह नंदा सुर्वे यांनी लिहिलं आहे. सर्व पुरस्कारप्राप्त लेखकांचंही मन:पूर्वक अभिनंदन.

दुसरं म्हणजे महाराष्ट्रसाहित्य परिषदेचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प असलेला 'भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य' हा ग्रंथ लवकरच सिद्ध होत आहे. डॉ. अश्विनी धोंगडे



अनुक्रमणिका

यांच्या संपादनाखाली साकारत असलेल्या या ग्रंथात मराठीसहित हिंदी, इंग्रजी, तेलुगू, तमिळ, कन्नड, मल्याळम, उडिया, बंगाली, पंजाबी, गुजराती, उर्दू, आसामी आदी भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्याच्या विविध पैलूंवर प्रकाशझोत टाकणारे लेख समाविष्ट करण्यात आले आहेत. त्या त्या भाषांतील अभ्यासक-संशोधक मंडळींनी हे लेख लिहिले आहेत. सुमारे साडेपाचशेहून अधिक पृष्ठांचा हा दर्जेदार संदर्भग्रंथ साधारण या वर्षी सप्टेंबर महिनाअखेरीस वाचक-अभ्यासकांच्या हाती येईल. या ग्रंथामुळे मराठी साहित्यविश्वात एका मौलिक ग्रंथाची भर पडणार आहे हे निश्चित.

आता या अंकाच्या निमित्ताने.

मराठी साहित्यातील एक महत्त्वाचं नाव म्हणजे श्याम मनोहर. त्यांना अलीकडेच महाराष्ट्र फाउंडेशनने जीवनगौरव सन्मान देऊन गौरवलं. त्या वेळी त्यांनी केलेलं छोटेखानी पण विचारप्रवर्तक असं भाषण खास पत्रिकेच्या वाचकांसाठी या अंकात प्रसिद्ध करत आहोत.

आधुनिक मराठी कवितेत बालकवींना महत्त्वाचं स्थान आहे. बालकवी म्हटलं की त्यांची वैशिष्ट्यपूर्ण निसर्गकविता आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते. बालकवींच्या निसर्गकवितेतील बदलत्या भावविश्वावर नेमका प्रकाश टाकणारा लेख ज्येष्ठ समीक्षक डॉ. गो. मा. पवार यांनी या अंकात लिहिला आहे.

गेल्या अंकापासून सुरू करण्यात आलेल्या 'समकालीन कवी' या मालिकेला वाचक-अभ्यासकांचा चांगला प्रतिसाद मिळाला. गेल्या अंकात श्रीधर नांदेडकर यांच्या कवितेवर ज्येष्ठ समीक्षक प्रभा गणोरकर यांचं भाष्य आणि नांदेडकर यांचं स्वतःच्या कवितेविषयीचं मनोगत प्रसिद्ध केलं होतं. या अंकात वेगळ्या घाटणीची कविता लिहिणारे समकालीन महत्त्वाचे कवी दिनकर मनवर यांचं मनोगत आणि त्यांच्या कवितेचा प्रभा गणोरकर यांनी घेतलेला परामर्श आहे.

अलीकडच्या काळात काही महत्त्वाचे साहित्यिक काळाच्या पडद्याआड गेले. त्यात मराठी कथा-कादंबरी-कविता-समीक्षा क्षेत्रात मोजकीच पण अस्सल साहित्यनिर्मिती करणारे विलक्षण आत्मनिष्ठ लेखक डॉ. विलास सारंग, राज्यशास्त्राचे गाढे अभ्यासक आणि वैचारिक साहित्यकार डॉ. यशवंत सुमंत, प्रसिद्ध नाटककार अशोक पाटोळे, अनुवादाच्या प्रांतात मौलिक योगदान दिलेल्या लेखिका वीणा आलासे, दलित व वंचितांच्या न्याय्य हक्कांसाठी संघर्ष करणारे आणि 'जग बदल घालुनि घाव' या आत्मकथनाचे लेखक एकनाथ आवाड, तसेच तरुण कवयित्री-पत्रकार प्रियांका डहाळे यांचा समावेश आहे. या सगळ्यांनीच आपापल्या परीने मराठी साहित्यात मौलिक भर घातली आहे. त्यातील सारंग, सुमंत आणि डहाळे यांच्या साहित्यिक कर्तृत्वावर दृष्टिक्षेप टाकणारे अनुक्र प्रशान्त बागड व रामू रामनाथन, डॉ. राजा दीक्षित आणि विष्णू जोशी यांचे लेख या अंकात समाविष्ट करण्यात आले आहेत. इतर साहित्यिकांवरही पुढील अंकात लेख प्रसिद्ध करत आहोत. या सर्व दिवंगत साहित्यिकांना 'मसाप'ची भावपूर्ण आदरांजली!

याशिवाय रंगनाथ पठारे यांच्या 'चोपक फलोद्यान' या कादंबरीचं अंतरंग उलगडणारा संतोष पद्माकर पवार यांचा लेख आणि डॉ. माधवी देसाई यांच्या 'ग्रेस : कविता आणि स्त्रीप्रतिमा' या समीक्षाग्रंथावर भाष्य करणारा डॉ. मेधा सिधये यांचा लेख या अंकात आहे.

'मसाप'च्या अतिथी निवासाला नुकतीच ५० वर्षं पूर्ण झाली. या निमित्ताने या निवासाच्या आठवणींना उजाळा देणारा महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे माजी संपादक डॉ. वसंत स. जोशी यांचा लेखही या अंकात समाविष्ट करण्यात आला आहे.

कल्पक प्रकाशकांच्या विविध प्रकल्पांची ओ करून देणाऱ्या 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरात प्रा. सुजाता शेणई यांनी 'शब्द पब्लिकेशन'चे येशू पाटील यांची मुलाखत घेतली आहे. त्यातून त्यांचा 'शब्द- द बुक गॅलरी ते मुक्त शब्द' हा प्रवास जाणून घेतला आहे. याशिवाय काही निवडक पुस्तकांचा परिचयही 'निवड नवे' या सदरातून करून दिला आहे.

या अंकाचंही वाचक-अभ्यासक स्वागत करतील अशी आशा आहे. आपल्या प्रतिक्रिया जरूर कळवा. अंकासाठी साहाय्य करणाऱ्या सर्वांचे मन:पूर्वक आभार!

◆

महेंद्र मुंजाळ
भ्रमणध्वनी : ७७४४८२४६८५
mahendramunjal@gmail.com

(गेल्या दोन अंकांप्रमाणेच पत्रिकेचा हाही अंक परिषदेच्या masapapune.org या संकेतस्थळावर पीडीएफ स्वरूपात उपलब्ध करून देण्यात आला आहे. त्याचबरोबर या अंकापासून 'न्यूज हंट' या मोबाइल ॲपवरही हा अंक वाचता येईल. पत्रिकेच्या वाचकांनी याही सुविधेचा लाभ घ्यावा. असं आवाहन आहे.)



अनुक्रमणिका



भाषण

श्याम मनोहर

एका साध्या प्रसंगाच्या निवेदनाने सुरुवात करतो. आम्ही घरचे लोक आणि आमची कामवाली असे एका पौर्णिमेच्या रात्री कॉफी पीत टेरेसवर बसलो होतो. कामवाली प्रौढ, आजी झालेली होती. गप्पांच्या ओघात कामवाल्या बाई म्हणाल्या, "लहानपणी आम्ही मुली-मुली गावाकडे असे बसायचो आणि चांदण्या मोजायचा खेळ खेळायचो आणि मोजताना पहिली चांदणी कोणती धरली होती हेच सुटून जायचं. कुठून सुरुवात करायची तेच सुधरायचं नाही. लई गोंधळ उडायचा. आमचं आम्हाला लई हसू यायचं."

हा प्रसंग काहीसा प्रातिनिधिक आहे. आकाशात किती चांदण्या आहेत, हे लहानपणी उत्सुकतेचे असते. मोजायच्या कशा, याची पद्धत सापडत नाही. नद्या स्वच्छ करायच्या आहेत, काय आहे पद्धत? शहर स्वच्छ करायचेय, काय आहे पद्धत? रहदारी सुरळीत करायचीय, काय आहे पद्धत? भ्रष्टाचारनिर्मूलन करायचेय. काय आहे पद्धत? शेतकऱ्यांच्या आत्महत्या थांबवायच्यात, काय आहे पद्धत?

पद्धती शोधणे हीच भारतातली समस्या झालीय.

फाळक्यांनी मुंबईत सिनेमा बघितला. झपाटून जाऊन फाळके इंग्लंडला जाऊन कॅमेरा शिकून आले आणि त्यांनी सिनेमा तयार केला. पाश्चात्त्य राष्ट्रात, अमेरिकेत जाऊन शिकून येऊन इथे करणे ही पद्धत पडली. लोकशाही अशीच आली. कपडे, चालीरीती अशाच आल्या. पाश्चात्त्य राष्ट्रांनी एखादे तंत्रज्ञान दिले नाही तर संदर्भ घेऊन ते तंत्रज्ञान विकसित केले जाते. 'पूर्णपणे भारतीय बनावटीचे रॉकेट' असे म्हटले जाते. भारत स्वतंत्र झाल्यापासून पुनर्शोध, रिसर्च करणे हेच चालू आहे. साहित्यातही हे घडले आहे. अस्तित्ववाद, अॅब्सर्डिटी ते पोस्ट-मॉडर्निझम-पुनर्शोध, रिसर्च चालू आहे.

मग आपले काय, हा प्रश्न यातून तयार झाला. तंत्रज्ञान वगैरे दुसऱ्याकडून घ्यायला हरकत नाही, पण आपली संस्कृती टिकवली पाहिजे, असे उत्तर येऊ लागले. वेदात कॅल्क्युलस होते, विमानविद्या होती. गणपती हे प्लॅस्टिक सर्जरीचे उदाहरण आहे, असे सुरू झाले.

म्हणजे आता वेद, पुराणे यातून पुनर्शोध/रिसर्च सुरू. भारतीयांना 'रि-सर्च'चे वळण लागलेय. 'सर्च'चे, शोधाचे वळण लागत नाहीय.

साहित्याच्या बाबतीत अजून भारतीय जुन्या साहित्याचा पुनर्शोध घेण्याचे व ते उदाहरण म्हणून ठेवण्याचे सुरू झाले नाहीय. शोध घेणे तर नाहीयच. त्यामुळे मराठी साहित्यात वास्तवाचे चित्रण करणे घडतेय. ज्ञात असलेलेच साहित्यात



# शोध, पुनर्शोध आणि निर्मितीची प्रक्रिया

**'महाराष्ट्र फाउंडेशन' या संस्थेतर्फे यंदा ज्येष्ठ लेखक श्याम मनोहर यांना जीवनगौरव पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात आले. या वेळी त्यांनी केलेले विचारप्रवर्तक भाषण इथे प्रसिद्ध करीत आहोत.**





मांडले जातेय. साहजिकच समाजाला अशा साहित्यात रस येत नाहीय. प्रगत संस्कृतीचे एक लक्षण म्हणून साहित्याकडे पाहिले जाते. साहित्याचा प्रसार व्हावा, साहित्याला प्रोत्साहन मिळावे म्हणून शासन योजना आखते. साहित्यासाठी पुरस्कार आहेत. अनेक पातळींवर साहित्य संमेलने आहेत. प्रकाशन समारंभ, काव्यवाचन, कथात्म साहित्याची अभिवाचने, चर्चासत्रे असे सर्व प्रकार चालू आहेत. फक्त अद्ययावत वाचनालये महाराष्ट्रभर नाहीत. कोणत्याही राजकीय पक्षाच्या कार्यक्रमात वाचनालये काढायचे दिसत नाही, किंवा उद्योगपतीही या कार्यक्रमात लक्ष देत नाहीत.

समाज साहित्यात सवडीने नेमस्तपणे गुंतलेला आहे. साहित्य मवाळपणे, हो, मवाळपणेच घडत असते, तेव्हा समाज साहित्य घडू देतो. साहित्य मवाळपणा सोडून घडू लागले, तर मात्र काही समाजघटक तावडतोब अशा साहित्याला 'वठणीवर' आणायला चवताळून उठतात. 'आपली संस्कृती जपली पाहिजे' म्हणतात. उरलेला समाज मध्ये पडत नाही. शासनव्यवस्था मध्ये पडत नाही.

उरलेला समाज काय करत असतो? आर्थिक स्थिती, शारीरिक आरोग्य, कौटुंबिक सुरक्षितता यांची काळजी वाहत असतो.

.आणि शासनव्यवस्था काय करत असते? जातीयता, धार्मिकता, आर्थिक व्यवहार, बलवान होणे, जगाचे नेतृत्व करणे, नद्या स्वच्छ करणे, शहरे-गावे स्मार्ट करणे, नवे रोजगार निर्मिणे, चंद्रावर जाणे, औद्योगिकीकरण, शेती, शेअरबाजार, पद्मपुरस्कार, नेत्यांचे पुतळे, सत्ता सांभाळणे- या सर्वांचा हिशोब करत, राजकारण करू नका, असे विरोधकांना बजावत मार्ग काढत असते... 'मार्ग' काढत असते, 'उत्तरे' नव्हेत. उत्तरासाठी शोध घ्यावा लागतो.

समाजाचे प्रश्न सोडवण्यासाठी साहित्याचा काहीही उपयोग नाही, असे समाजाचे व शासनाचे गुप्तपणे मत असते.

उघडपणे म्हटले जाते : विज्ञानानेच समाजाचे प्रश्न सुटतील.

'विज्ञान' हा शब्दप्रयोग समाज व शासन करतात. पण त्यांना खरे तर म्हणायचे असते- तंत्रज्ञान, टेक्नॉलॉजी. तंत्रज्ञानाला 'विज्ञान' म्हटले जाते. 'तंत्रज्ञा'ला 'वैज्ञानिक' म्हटले जाते.

भौतिक प्रश्न सोडवणे ही आपल्या समाजाची पहिली गरज आहे. समाजाची दुसरी गरज आहे धर्म. समाजाला धार्मिक कर्मकांड हवेच आहे. शिवाय धर्माचा तात्त्विक अर्थही बरोबर वाटतो. धर्माच्या तात्त्विक अर्थात म्हणजे अध्यात्मात लोक गुंग होतात. विज्ञान, साहित्य, ही तिसरी, चौथी, पाचवी गरज आहे.

कोणत्याही धर्माची तत्त्वे वापरून नद्या वा शहरे वा गावे स्वच्छ करता येत नाहीत, हे सर्वांना माहीत आणि मान्य झालेले आहे. अर्थात ते गुपचूपपणे मान्य आहे.

दुसरे उदाहरण 'लोभ' या षड्‌रिपूंपैकी एका रिपूचे, विकाराचे घेऊ. सर्व धर्मांत 'लोभ धरू नये' असे तत्त्व आहे. भारतीय समाजात लोभाच्या विकारामुळे आर्थिक भ्रष्टाचाराचा मोठा प्रश्न तयार झाला आहे.

लोभ जिंकायचा कसा, लोभ जिंकायची पद्धत काय हे माणसाला उमजत नाही. आर्थिक भ्रष्टाचार थांबवण्यासाठी धर्माचा उपयोग होत नाहीय. भ्रष्टाचार संपवण्याचा बिनधर्माचा मार्ग म्हणजे माणसाचा लोभ ऑपरेट होणार नाही अशी व्यवहाराची पद्धत शोधणे.

माणसाचा लोभ ऑपरेट होणार नाही अशी सामाजिक पद्धत भारतीय लोकांना शोधता आलीय का? 'नाही', असेच उत्तर द्यावे लागेल.

नद्या स्वच्छ करणे, शहरे-गावे स्वच्छ करणे, भ्रष्टाचार संपवणे, रहदारी सुरळीत करणे, असे भौतिक प्रश्न सोडवण्याची धार्मिक पद्धत साधत नाहीय की बिनधार्मिक पद्धतही सापडत नाहीय, अशी भारतीय समाजाची करुण स्थिती होत आहे.

आणि मग प्रतीकात्मक किंवा प्रबोधनात्मक हाताळले जात आहेत. पद्धत शोधणे, हे घडत नाहीय. शोध घेणे, हे वळण भारतीय सभ्यतेत रुजलेले नाही.

भारतीय सभ्यतेत पुनर्शोध घेणे, रिसर्च हे कित्येक वर्षांपासून चालू आहे. जगात जे ज्ञात आहे ते पुनर्शोधत चालत राहायचे, असे चाललेले आहे. तंत्रज्ञानापासून ते तत्त्वज्ञानापर्यंत ते साहित्यापर्यंत.

शोध घेणे : म्हणजे कशाचा शोध घ्यायचा? उत्तर सोपे आहे : अज्ञाताचा. आणि अज्ञात म्हणजे एखाद्या व्यक्तीचे अज्ञात नव्हे, मानवजातीच्या अज्ञाताचे. माणूसजातीला अजून माहीत नाही त्याचा शोध घ्यायचा. आणि नुसते शोध घेत राह्यचे नाही, शोध लावायचा. नुसते अज्ञात असे म्हटले की हरवून जायला होते. अज्ञात कशाशी निगडित आहे? माणसाशी, विश्वाशी आणि जीवनाशी.

माणूस अजून सगळा समजलेला नाही. विश्व अजून पूर्णपणे समजलेले नाही. जीवनाचा अर्थ अजून पूर्णपणे समजलेला नाही. माणूस काय आहे? विश्व काय आहे? जीवनाचा अर्थ काय? यातले खूप अज्ञात आहे. मानवजातीलाच अज्ञात आहे. या अज्ञातातले शोधणे.

भारतीय सभ्यतेत अज्ञातातले शोधणे घडते आहे काय? नाही. कल्पनादारिद्र्य हे त्याचे एक कारण सांगितले जाते.

दैनंदिन जीवनक्रम प्रमुख उरतो आणि शोध घेणे त्यातून केले जाते. हे शोध घेणे म्हणजे पुनर्शोध होय. शोध घेणे हेच प्रमुख ठरून त्यानुसार दैनंदिन जीवनक्रम घडतो. शोध घेणे चोवीस तासांचे होते, तेव्हा तो पुनर्शोध नसतो तर शोध घेणे असते. पुनर्शोध बाह्यमनाचा व्यवहार असतो, शोध घेणे हा



अनुक्रमणिका

अंतर्मनाचा व्यवहार असतो.

अंतर्मनात अज्ञातातल्या एखाद्या पैलूचा सुगावा लागतो. सुगावा लागणे ही प्रक्रिया इन्ट्युशनने, अंतर्ज्ञानाने घडते. हा सुगावा नुसताच व्यक्त झाला तर त्याला दर्शनसाक्षात्कार म्हणता येते. सुगावा घेऊन तो सत्य म्हणून सिद्ध करावा लागतो. ही सिद्धता करण्यासाठी विवेक, रीझन वापरावे लागते.

अंतर्ज्ञान व विवेक यांनी अज्ञातातले शोधलेले ज्ञानशाखा निर्माण करते. भारतीय समाजात असे अज्ञातातले शोधणे घडत नाही का? उत्तर आहे- नाही घडत. अज्ञात असे काही नाहीच, अशी भारतीय समाजाची धारणा आहे का?

धर्माने सर्व सांगितलेले, शोधलेले आहे, अशी प्रत्येक धर्मातल्या माणसाची समजूत असते.

उदाहरण द्यायचे, तर मृत्यू काय आहे याचे उत्तर प्रत्येक धर्माने दिलेले आहे. तरी प्रत्येक माणसाच्या हयातीत असे पाच-सात तरी प्रसंग येतात, की त्याला मृत्यू काय आहे, हा प्रश्न नव्याने, ताजेपणाने पडतो. माणसाला नव्याने उत्तर हवे असते. विश्व काय आहे, जीवनाचा अर्थ काय, अशा प्रश्नांची उत्तरे धर्मांने दिलेली असतात, तरी माणसाला हे प्रश्न पडतात. म्हणजे 'शोधणे' ही वृत्ती जागी असते. प्रश्न अंतर्मनात जात नाहीत आणि शोध घेणे थांबते, असे होते.

विकार अंतर्मनात गेले तर माणूस विकृत होतो. अज्ञाताविषयीचे कुतूहल अंतर्मनात गेले तर माणूस सर्जनशील होतो.

प्रश्न अंतर्मनात घ्यायला माणूस भितो, कारण प्रश्न अंतर्मनात राहणे हे अतिशय वेदनादायक असते. शारीरिक कष्ट, शारीरिक वेदना, बाह्यमनाच्या वेदना यापेक्षा प्रश्न अंतर्मनात राहण्याच्या वेदना तीव्र असतात.

अशा वेदना भारतीय माणूस टाळू पाहतो का?

याला आणखी एक आयाम आहेच. भारतीय सभ्यतेत अशी एक धारणा झालेली आहे, की आर्थिक स्थिती नीट झाल्याशिवाय शोध घेणे, अज्ञातातले शोधणे करता येणार नाही.

शोधांचा इतिहास पाहिला तर हे प्रमेय चुकीचे ठरते.

भारतीय स्थिती अजून तरी असे अज्ञाताचा शोध घेण्याला अनुकूल नाहीय. ज्याला घ्यायचाय त्याने स्वतःच्या हिमतीवर घ्यायचाय.

अशी उदाहरणेही माणसाच्या इतिहासात, भारतीय इतिहासातही आहेत. नसली तरी अशी उदाहरणे निर्माण करायला हरकत नाही. अज्ञातातले जाणून घ्यायचा समाज सामूहिकपणे प्रयत्न करतो असे नसते. अज्ञातातले जाणून घ्यायला समाज उत्सुक असतो, आणि अज्ञातातले शोधायचे असते व्यक्तीनेच. हे व्यक्तिवाद, समूहवाद असे द्वंद्व नसते. व्यक्तीचे काम आणि समूहाचे काम अशी ही समज असते. व्यक्तीने शोधायचे आणि समाजाला द्यायचे. अज्ञातातले शोधण्याने संस्कृती निर्माण होते. संस्कृतीने जगण्याची पद्धती, सभ्यता, परंपरा सुधारतात. परंपरा जपायच्या नसतात, मुद्दाम मोडायच्या नसतात. अज्ञातातले शोधून सुधारायच्या असतात.

कथात्म साहित्यानेही मानवजातीला अज्ञात असलेले शोधायचे असते. नवीन धर्म स्थापना होणे कधीपासून थांबलेले आहे. जुने धर्म आहेत, तरी माणसाला 'स्वधर्म' हवाय. साहित्याने व्यक्तीला स्वधर्म स्थापायला साहाय्य करायचे आहे. किंवहुना, माणसाला स्वधर्म स्थापायची गरज असते, ही साहित्याची प्रेरणा आहे असेही म्हणता येईल.

अशी यातायात वाङ्मयाचे तत्त्वज्ञान निर्माण करते. वाङ्मयाचे तत्त्वज्ञान निर्माण होत राहणे प्रगत संस्कृतीसाठी आवश्यक असते. प्रत्येकाने हे आव्हान घ्यावे. मीही घेत आहे.

आणि अखेरीस आता मी धरून सगळ्या साहित्यकारांसाठी चिंतन करतो. जगातले मार्खेज, पामुख, सारामागो आणिक कोण कोण बाजूला सारा. मराठीतले नेमाडे, श्याम मनोहर बाजूला ठेवा. तेंडुलकर, आळेकर बाजूला ठेवा. अरुण कोल्टकर, सलील वाघ बाजूला ठेवा. कादंबरी, कथा, कविता, नाटक हे वाङ्मयप्रकार बाजूला ठेवा. सभ्यतेतल्या भाषांसह सर्व खाणाखुणा वापरा आणि मानवजातीच्या अज्ञातातला एखाद्या पैलूचा शोध लावा. 'शोध घेणे'शी थांबू नका. शोधच लावा. शोधच लावायचा आहे ही तुमचीच जबाबदारी आहे, हे समजून घ्या. अध्यात्म बाजूला ठेवा आणि मीपणा घालवायचा कसा याची चक्क प्रतिमा शोधा. आणि हां, हे सगळे अंतर्मनात घडले पाहिजे. प्रश्न अंतर्मनात जाणे हे नैसर्गिकच असते. अंतर्मनात जगरहाटी असेल तर प्रश्न अंतर्मनात जायला अडथळा होतो. जगरहाटी बाह्यमनात राहू द्यावी म्हणजे प्रश्न अंतर्मनात आपोआप जातो. प्रश्न अंतर्मनात राहू द्यावा. त्याच्या वेदना सोसाव्यात. मग निर्मितीचा सुगावा लागतो. सुगाव्याने उत्तर सिद्ध करावे. सिद्ध करणे महत्त्वाचे. यासाठी विवेक वापरावा. विवेक वापरणे तसे यांत्रिक असते, शारीरिक कष्टाचे असते.

अशा प्रकारे निर्माण झालेले साहित्य ओरिजिनल असते. या साहित्याला संगीतकार चाल लावतील, दिग्दर्शक रंगमंचावर वा पडद्यावर आणतील, समीक्षक साहित्याचे प्रकार पुन्हा करतील.

◆

**श्याम मनोहर**
०२०-२४२२४६०२



आस्वाद

संतोष पद्माकर पवार




एका आरंभाचे प्रास्ताविक आणि आता 'चोषक फलोद्यान' पर्यंत अखंड प्रवाहित असा आहे.

एक दीर्घ आणि सलग म्हणता येईल असे हे सर्व कादंबरीलेखन आहे. यात पात्रे बदलतात, कथानक बदलते, पण मूळ सांगण्याची ऊर्मी आस्थेवाईकपणे एका सरळ रेषेत प्रवास करताना दिसते. रूढ अर्थाचे नायक, नायिका, खलनायक मराठी कादंबरीने संपवून टाकले. इथे आपल्याच मातीतले भलेबुरे शोधून मांडण्याचा एक चिवट उद्योग या सर्व कादंबऱ्यांतून चालू असल्याचे दिसते. एरवी साधे-सरळ जीवन जगणारे घटक कसे तापदायक अनुभव घेऊ शकतात हे पठारे यांनी अर्ध-ग्रामीण, अर्ध-शहरी पात्रकथनातून मराठी भाषेत प्रथमच जिवंत केले. ते कोणत्याही अर्थाने कप्पेबाज झालेले नाही. ते अधिक सुटे असूनही त्यांचा एकमेकांशी जोडणीचा जो अद्भुत धागा आहे तो मात्र चिवट स्वरूपाचा असून या गोष्टी पठारे यांनी वाचकाचा हात घट्ट धरून आपल्या धीरगंभीर आवाजात सलग सांगितल्याप्रमाणे वाटत राहतात.

# 'चोषक फलोद्यान'
## वास्तवाचा पट मांडणारे नवे मिथक

रंगनाथ पठारे यांच्या लेखनाचा उभा आणि आडवा अक्ष काढून पाहिला तर त्यात एक समान बिंदू सापडतो. तो मानवी जीवनाच्या आस्थेचा आणि अपरिमित अशा कुतूहलाचा.

मानवी मनाचा तळ शोधण्याला ते प्राधान्य देत आले आहेत. 'दिवे गेलेले दिवस'पासून कादंबरीलेखनाचा सुरू झालेला ओनामा रथ, चक्रव्यूह, हारण, टोकदार सावलीचे वर्तमान, दुःखाचे श्वापद, ताम्रपट, नामुष्कीचे स्वगत, त्रिधा, भरचौकातील अरण्यरुदन, कुंटेचा लोलक,

'लेखकाचा आवाज' ही त्यांनी जपलेली ऊर्मी आणि त्याला स्त्री-पुरुष नात्याची दिलेली पार्श्वभूमी अपूर्व स्वरूपाची आहे. स्त्री-पुरुष संबंधातील रूढ वर्णने नाकारत त्याला स्वामित्व आणि पुरुषी हिंस्रता यांचे वेगळे परिमाण शोधून स्त्रियांचे समाजजीवनातील जगणे दिवसेंदिवस कसे करुणास्पद होत चालले आहे याचा पठारे यांना अविरत शोध असल्याचे दिसते. त्यात कामुकता नाही तर कारुण्य आहे. स्त्री-पुरुष नात्याची जैविक ओढ अटळ असली तरी त्यात स्त्रियांची होरपळ कशी होते याचेच मुख्य सूतोवाच त्यांच्या संपूर्ण

कादंबऱ्यांतून येते.

तटस्थ निवेदन हा पठारे यांचा स्थायीभाव. त्यातून त्यांच्यातील लेखक शोधाची भटकंती आरंभतो. लेखकाचे कादंबरीतले तेवढ्यापुरते असणे वाचकाला पुढे वाचनासाठी आणखी प्रोत्साहित करत राहते. विविध कथनपरंपरा आणि निवेदनशैलीचे अनेक प्रयोग हे त्यांच्या कादंबऱ्यांतून सातत्याने दिसते. 'चोषक फलोद्यान' या त्यांच्या नव्या कादंबरीने काळ आणि खोलीचे नवे परिमाण स्वतःपुरते निर्माण केले आहे. येथेही एक लेखक आहे आणि येथेही त्याच्याभोवती कथानकाचा कोश तयार झाला आहे.

वास्तविक हे जगच आभासी आहे. येथे मिळालेली अनुभूती सर्व काळांची बंधने शिथिल करून टाकते आणि त्याचा स्वतःचा मन मानेल तसा रूपबंध साकार करते. 'चोषक फलोद्याना'त पठारे यांच्या लेखनात आढळणारी नेहमीची जी ताणयुक्त वैशिष्ट्ये आहेत त्यांच्यात गुणात्मक आणि संख्यात्मक सुधारणा झालेली दिसते. ज्या मानवी मनास या फलोद्यानातील फळे चाखावयास मिळत आहे असे वाटते, त्याउलट हे फलोद्यान मिळून एकाच व्यक्तीचा आस्वाद घेत आहे, असे उलटे आणि महाभयानक वास्तव या कादंबरीने मराठीत आणले आहे. डोळ्यातील निरंजनाने

**साठोत्तरी काळातील एक महत्त्वाचे कथाकार-कादंबरीकार असलेल्या रंगनाथ पठारे यांची 'चोषक फलोद्यान' ही कादंबरी अलीकडेच प्रकाशित झाली आहे. या कादंबरीचे अंतरंग उलगडणारा लेख.**

आपली तृष्णा भागवू पाहणाऱ्या पण अंतर्यामी अत्यंत प्रामाणिक आणि सोज्वळ, प्रांजळ अशा कथनचेहऱ्याने वावरणाऱ्या लेखकाचा 'प्रॉब्लेम' त्यालाच उलगडलेला नाही. त्याचा शोध घेण्याची त्याची पद्धती अत्यंत अनोखी असून एकाच जागी जायबंदी झाल्यावरदेखील कल्पनेच्या साहाय्याने त्याने जायबंदीविश्वाच्या पलीकडे घडविलेली आपल्या आस्तित्वाच्या शोधाची सफर वाचकाला अचंबित करते.

आजवर अनेक कथा-कादंबऱ्या लिहिलेल्या एका अत्यंत शक्तिशाली कथनकाराशी इथे वाचकाची गाठभेट आहे आणि तिथे काळ, खोलीचे पात्र अधिक रुंदावत नेत आपल्याच आजवरच्या प्रवासाला लेखकाने एका मोठ्या उंचीवर नेले आहे. क ांद्याच्या पापुद्र्याप्रमाणे कथेच्या पोटातील कथा उलगडताना वाचक गुंगून जातो आणि अस्वस्थदेखील होत राहतो, हे या लेखनाचे वैशिष्ट्य आहे.

लेखकाचे स्वतःचे एक जग आहे. आणि ते त्याला वाटते तेवढे खासगी राहिलेले नसून तो लेखक असल्याने त्याला एक मोठे सामाजिकपण प्राप्त झाले आहे. आता एखाद्या भाषेतला मोठा लेखक असणे या 'चोषक फलोद्यान'च्या नायकाचे 'सोशल स्टेटस' वेगवेगळे प्रसंग घडताना एवढे ठसठशीत बनत जाते की त्याची प्रत्येक कृती ही एक सामाजिक घटनेचा आकार धारण करते.

एक स्थिरस्थावर झालेला लेखक, ज्याच्या मुलाबाळांची लग्नकार्ये उरकली आहेत, जो फारसा समाजात मिसळत नाही, त्याच्या सामाजिक संपर्कासाठी त्याचे मित्रच त्यास मदत करीत असतात. पण त्याचे स्वतःत रमणे आहे ते वरवर पाहता त्यालाच एक ा कु ठ ल्याशा 'ऑब्सेशनल



प्रोसेस'कडे नेते आहे. तो ते जाणीवपूर्वक करतो आहे असे वाटूनही ते तसे सुरू ठेवताना परिणामाची चिंता वाहण्यात त्याला कोणताही रस राहिलेला नाही, आणि विनदिक्कतपणे आपल्या मनातील लैंगिक भावनांना साकार रूप देण्याचा मार्ग त्याला नजरभेटीतून, डोळ्यांशी डोळे भिडवून आणि पुढे क्रमाने विकसित अथवा नष्ट होणाऱ्या नात्याकडे घेऊन जातो.

त्याच्या आयुष्यातील नेत्रा, सुनेत्रा, सुलोचना, नीलाक्षी, आसरा, कामाक्षी अशा आणि इतर येणाऱ्या स्त्रियांच्या बाबतीत हा नजरेचा खेळ थोड्याबहुत प्रमाणात झालेलाच आहे. एखादे नाते विकसित झाले किंवा कायमचे नष्ट तरी झालेले आहे. त्या तशा आकर्षून घेणाऱ्या डोळ्यांच्या आधीच्याच चाहत्याने लेखकाच्या आयुष्यात मोठा अडथळा निर्माण केला आहे आणि ते आयुष्यच संपवून टाकले आहे. नात्याच्या औरसपणातून अनौरसतेकडच्या वाट चाली भयानक अशी अडथळ्यांची शर्यत आहे आणि ती बळेच खेळण्याचा डाव इथे लेखक मांडत आहे. राजकारणातल्या सत्तेचा पाशवी खेळ मांडणाऱ्या गावोगावच्या प्रतिनिधींच्या छोट्या-मोठ्या रूपाने हा 'नजरेचा खेळ' धोकादायक वळणावर आणून सोडला आहे. ज्या स्त्रीने आधीच उंबरा ओलांडला आहे, तो ज्याच्यासाठी ओलांडला आहे, तो तिच्या धन्यापेक्षा मोठा शक्तिशाली आणि बलवान आहे. त्याची दहशत आहे. त्याची रखेली बाई असलेल्या स्त्रीला त्यामुळे सर्वसामान्य स्त्रीपेक्षादेखील मोठ्या मानमर्यादा राखणे आलेच. आणि तशा सत्तेच्या अति निकट हाय करंट तारांच्या ताणामध्ये लेखकाला आपल्या डोळ्यांच्या निरांजनाची आच शमवायला जागा सापडावी, तशी शक्यता निर्माण होऊन ती फलद्रूप व्हायला मिळावी, तसा हा सामान्य योगायोगाचा प्रकार नाही. एका पाशवी सत्तेच्या खेळातल्या वर्मस्थानावर खेळी करून आपले अस्तित्व जोखण्याचा प्रयत्न करणे हे जिवाशी येणार हे निश्चितच आहे. बरे, हे एकदा घडत नाही तर वारंवार घडते आहे. एकप्रकारे आगीशी खेळण्याची लेखकाची चाह त्याच्याही आयुष्यात ताण निर्माण करते.

सुनेत्राशी सूर जुळला असे वाटत असताना चेअरमन दसमुकराव तिरसिंगरावाची तिच्यातील गुंतवणूक समजणे आणि त्यातून सुरू होणारी प्रश्नांची मालिका मंत्री पवनराव खिलारी यांची उपपत्नी असलेल्या सुलोचनाबाईंशी निर्माण होणाऱ्या धाग्यातून पुन्हा सत्तेच्या माजोरीपणाला आव्हान देण्यापर्यंत विकास पावत राहते. मुळात सुलोचनाबाई त्यांच्या आध्यात्मिक गुरुजींच्या नजरेच्या खेळात आधीच अडकलेल्या, तिथून त्या पुन्हा लेखक रामराव पाटलांच्या अधीन झालेल्या आहेत.

धर्मसत्ता आणि राजसत्ता यांचा स्त्रीच्या प्रलोभनाबाबतचा अटळ मुद्दा रंगनाथ पठारे येथे चर्चेत आणतात आणि भावनेची कोवळीक उमलताच खुडून टाकून स्त्रीच्या जिवाची हेटाळणी करण्यास ह्या दोन्ही सत्ता कशा वरचढ ठरत असतात आणि लौकिकार्थाने फारशी मोठी नसली तरी लेखकाच्या सत्तेशी त्याची गाठ पडून निर्माण होणारी संघर्षाची बाजू ही लेखकाला नष्ट करीत जाते आणि त्यात ह्या सर्व स्त्रियांची कशी अवहेलना होत राहते, हा या कादंबरीच्या कथानकाचा खरा पदर आहे. लेखक म्हणून रंगनाथ पठारे यांचा हा उद्देश समजून न आल्यास मोठा अनर्थ घडण्याची शक्यता नाकारता येत नाही.

भाऊ पाध्यांसारखा लेखक जे आणि जेवढे स्त्रीबद्दल लिहून गेला आहे; विजय तेंडुलकर, जयवंत दळवींसारख्या लेखकांनी स्त्रीदेहाचे साहित्यातून जे आणि जसे वर्णन केले आहे त्याच्या पलीकडे जाऊन, त्यातील उत्तानता घालवून पठारे तिथे एक सजग म्हटली जाणारी कारुण्याची स्थापना करीत आहेत. हे त्यांच्या 'हारण' कादंबरीपासून सांगता येईल. त्यातील नायिकेचा प्रवास हा असाच पुरुपलिंगसत्तेला बळी पडत निघालेला आहे. 'दुःखाचे श्वापद'मधल्या मालझाडेबाईंच्या डोळ्यांत दिसलेली एक हिंस्र श्वापदाची भीती लेखकाला तेथेही अस्वस्थ करून गेली आहे आणि कादंबरीने तेथे आकार घेतला आहे. पुढे 'त्रिधा'मधल्या त्या तिघींच्या आयुप्याचा खेळ याच वासनेच्या पटाने लपेटून काळाच्या वेशीवर टांगला आहे.

'कुंठेचा लोलक'मधून त्या तशा अतृप्तीने एखाद्या स्त्रीला कोणत्या धोकादायक वाटेवर नेऊन सोडले आणि तेथे एखादी लेखकाची महाकाय आकृती तिची कशी सोडवणूक करते आहे याचे चित्रण आले आहे.

'नामुष्कीचे स्वगत'मधून लिंगभावाची जाणीव ही आयुप्यभर विविध दबावांखाली राहत संधी मिळेल तिथे कशी उफाळून येते आणि जगणे-सावरणे कसे मुश्किल होऊन जाते याविपयी भाप्य करून जाते.

'एका आरंभाचे प्रास्ताविक' मध्येदेखील निमशहरी वस्तीचे संदर्भ देत अधोविश्वात स्त्रीच्या जगण्याची कशी कुतरओढ होत आहे आणि तिथेही आपल्या उपलब्ध सत्तेद्वारा पुरुष एखाद्या स्त्रीजीवनाशी कसा खेळतो आणि त्यातून कसे सामाजिक भयाण वर्तमान जन्म घेते याचा शोध लेखकाने घेतला आहे.

हे विवेचन खूप दीर्घ आणि आणि विस्तृत बनू शकेल. पण 'चोषक फलोद्यान' या कादंबरीच्या एका वळणाशी लेखक म्हणून रंगनाथ पठारे यांच्या समग्र आशयसूत्रांचा नव्याने शोध घेण्याची गरज निर्माण होते आहे.

उलट, मराठीतले थोर म्हणविले जाणारे कादंबरीकार भालचंद्र नेमाडे ह्यांनी 'कोसला' आणि नंतरच्या संपूर्ण



अनुक्रमणिका

चांगदेव चतुष्टयात कोठेही स्त्रियांविषयी व्यक्त न होता फक्त 'हिंदू' कादंबरीत महाराष्ट्रातल्या ग्रामीण स्त्रीचे वास्तव सांगण्याचा प्रयत्न केला आहे. झेंडीवाईपासून देशमुखांच्या गढ्यातील स्त्रियांपर्यंतच्या त्याचा वास्तव चित्रणाचा नमुना वेगळा आहे खरा, पण तो त्यांनी आधीच्या कोणत्याही लेखनात येऊ दिलेला नव्हता. मुद्दाम भूमिका म्हणूनही येऊन दिला नसावा. कारण आधीच्या फडके-खांडेकर युगाने स्त्रीला वाईट अर्थाने लेखनातून पेश केल्याबावत एक सार्वत्रिक आक्षेप घेतला जात असे. एका अर्थाने केवळ पितृसत्ताकाचे दर्शन करण्यात नेमाड्यांनी आपली पहिली पाच निर्मितिस्थळे नष्ट केली तसे पठारे यांच्या लेखनाबावत म्हणवत नाही. लैंगिक भावना ही सहज आणि नैसर्गिक निर्मिती आहे आणि तिचे अस्तित्व हे चिरंतन स्वरूपाचे आहे. त्यात वावगे असे काही नसून आदर्श कलाकृती घडवणे म्हणजे असा काही भाग आयुष्यात असतो हे दडवणे, हे सूत्र रंगनाथ पठारे यांनी नुसते नाकारलेले नाही तर लाथाडलेले आहे.

म्हणूनही रंगनाथ पठारे यांचे लेखन नापसंत करणारे लोक आपल्या वाङ्मयीन संस्कृतीत असतीलही; पण या लेखकाचे अस्तित्व त्यांना सहजी पुसता येणार नाही. असे करणे म्हणजे त्यांनी प्राकृतिक भावनांना दडपण्याचा तो प्रकार ठरेल.

'चोषक फलोद्यान' सत्तेच्या विळख्यात अडकलेल्या आणि भावनेचा ओलावा शोधू पाहणाऱ्या प्रेमी जिवांचा तडफडाट मांडणारा एक केवळ प्रयत्न नाही तर एक सुफल असा रसरशीत प्रत्यय आहे आणि तो नाकारता येणे अशक्य आहे.

कथानकाची सरमिसळ आणि त्यांचे एकमेकांत अजबपणे घुसणे आणि पात्रांना आपापली नावे बदलून तीच स्थळे, ते प्रसंग पुन्हा पुन्हा जिवंत करणे, आणि कोणता प्रसंग आधी घडला असावा याच्या संगतीने वाचकाला संभ्रमित करायला लावणारे अद्भुत कथानक रंगनाथ पठारे यांनी या कादंबरीत निर्माण केले आहे.

'चोषक फलोद्यान' म्हणजे 'कोमाच्या' अवस्थेत गेलेल्या आजाऱ्याच्या मेंदूने कल्पनेला ताण देऊन देऊन घडवलेली ही अजब सफर म्हणावी लागेल. जो लेखक आपल्या मृत्यूचे वर्तमान सांगतो आहे तोच आपल्या शोधासाठी बौद्ध भिक्खू बनूनदेखील हिंडतो आहे.जो आपल्या मृत्यूनंतरच्या स्मारकाला भेट तो आहे तोच त्या गावात साधू म्हणून अवतरतो आहे, आणि ज्या कारणाने त्यास मारले गेले आहे, त्याच सुनेत्राच्या नेत्रनिरंजनांशी साधू बनून पुन्हा वेगळा खेळ मांडतो आहे. तो आपल्या मृत्यूनंतर आपल्या घरालाही भेट देत आहे आणि त्याला तेथे कोणी ओळखतही नाही. तेथे तो बोलतो ते सर्व दैवी मानून ऐकले जाते.

**हे 'चोषक फलोद्यान' एक मिथक न उरता हळूहळू वास्तवच ठरत जाते. अनेक तुकड्यांचे असंबद्धपणे एकत्रित येऊन त्यातून पुन्हा एका सलग चित्राचे दृग्गोचर होणे हे वैशिष्ट्य या कादंबरीने साधले आहे. प्रश्न आणि उकल अशी ढोबळ रचना या कादंबरीत मोडीत निघाली असून, प्रश्नच प्रश्न आणि त्यांची उकलच उकल. त्याला कोणताही एक शेवट नाही तशी त्याची कोणतीही एक सुरुवात नाही. कादंबरीचा आरंभबिंदू हा दृश्य उलगडवत नेणारा आहे. तो वाचकाला चकित करतो. आणि कादंबरीचा शेवट जवळ आल्याने पुढे काय असेल या विचाराने वाचक स्वत:ला थांबवू शकत नाही.**



पण हे सर्व पुन्हा उघडकीस येणे त्याच राजकीय नेतृत्वामुळे शक्य होते, ज्याने लेखकाचा भरचौकात अंत घडविलेला असतो. कारण 'नजरेचा खेळ' ओळखण्याचे अजब कसब त्यालाही प्राप्त आहेच.

लेखकाच्या जीवनेच्छेच्या आड ही राजकीय महत्त्वाकांक्षा वारंवार येते आणि त्याच्या सर्व स्वप्नांचा चक्काचूर करून टाकते.

लेखक म्हणून रंगनाथ पठारे यांचे हे सूचन महाभयंकर असे आहे, आणि आपल्या सर्वसामान्यांच्या जीवनाला राजकारणाने कसे पोखरून टाकले आहे आणि त्याचे सर्वस्पर्शित्व कसे उपद्रवी आहे याचे चित्रण इथे आले आहे.

लेखकाची खेडूत पार्श्वभूमी आणि तिथला त्याचा बालपणातला भाग कादंबरीत येतो. म्हशी राखणाऱ्या त्याच्या चुलत्याशी त्याचे संवादक्षण कादंबरीत वारंवार मध्ये मध्ये डोकावतात. ते या कादंबरीला एक वेसलाइन देण्याचा प्रयत्न करतात. लेखकाची बायको त्या लाइनला अधिक गडद करते आहे, तर लेखकाच्या राघव या लहान मुलाने बोलता बोलता निर्मिलेले चोषक फलोद्यानाचे रूपक अख्ख्या कादंबरीची 'बाउंड्री' बनत आहे.

पात्रांना नावे देण्याची नजाकत तर वरील स्त्रियांच्या नावांत आलीच आहे. पण मुलांची नावे रघुपती, राघव, तर साहित्यिक मित्र 'राजाराम' आहेत, तर आणिक एक धडपड्या साहित्यिक मित्र 'सीताराम' अशी नावे चोषक फलोद्यानाला अधिक काव्यरूप बनवितात. सुलोचनाबाईंचे नाव कथानकाच्या अद्भुत वळणावर 'अंबा' बनते. तर

त्यांच्या दोन्ही मुलींची नावे अंबिका, अंबालिका अशी बनत जातात आणि एक वेगळेच 'महाकाव्य'रूप महाभारत आपल्याला तेथे जाणवू लागते. दसमुकराव तिरसिंगराव, दसरतराव आयुधराव अशी नावे ही त्या व्यक्तींची प्रवृत्तिवाचक जास्त आहेत. एकूण, पात्रांना नावे देण्याची पठारे प्रवृत्ती या कादंबरीतही जाणवते.

बोलता बोलता लेखकाने यशोदेचा कृष्ण या धर्तीवर पश्चिमेच्या लोकांनी 'जसोदाज क्रिष्ण-जीझस ख्राइस्ट' केले आहे, हे चोषक फलोद्यान रूपक मोठेच खिळवून टाकणारे आणि पठारे यांच्या केवळ लेखक असण्याच्या पल्याड ते मानववंशशास्त्रज्ञ, भाषाविज्ञानतज्ज्ञ असल्याच्या शक्यतेपर्यंत वाचकाला नेऊन पोहोचविते. मराठीत अशा नव्या कल्पना निर्मिणारे किती कादंबरीकार झाले असतील? माझ्या मते जवळपास नाहीच. एखाद्या कवीपेक्षा उच्चकोटीची तैलबुद्धी वापरणारा आणि त्या बुद्धीची प्रसरणक्षमता कादंबरीत दाखविणारा असा लेखक मराठीत झाला असणे त्याचमुळे शक्य वाटत नाही.

'चोपक फलोद्यान' कादंबरीला निवेदनापासून परंपरेतल्या बालकथा, अद्भुतकथा, पंचतंत्र, वेताळ पंचविशी, बोधीकथा, मिथके, पुराणे, कॉमिक्स, विविध शब्द आणि त्यांचे सांस्कृतिक अधिष्ठान यांची अद्भुत सरमिसळ करण्याचा प्रकार या कादंबरीत घडत जातो.



चोपक फलोद्यान
रंगनाथ पठारे
शब्दालय प्रकाशन
पृष्ठे : २९६
मूल्य : ३७५ रुपये

आहे तेच वास्तव पुन्हा पुन्हा न्याहाळल्याने दरवेळी वेगळे भासत जाते आणि अनेक व्यक्तींचा मिळून होणारा चेहरा अंतिम एकाच चेहऱ्यात सामावत जातो. त्याचे विघटन होते तेव्हा कथा विस्मयाने विस्तार पावते आणि जसजसे ज्या व्यक्तींचे गट होतात किंवा अनेक चेहरे एका चेहऱ्यात एकत्रित होऊ लागतात तेव्हा कादंबरी अद्भुत रम्यतेचा अनुभव देऊ लागते. अशा आधिभौतिक गोष्टींनी कादंबरीत एक वेगळी जागा निर्माण केली आहे.

राजकीय आणि पुरुषी सत्तेच्या बळी असलेल्या स्त्री व्यक्ति रेखा सुलोचना, सुनेत्रा, आसरा, कामाक्षी, या परिस्थितीच्या रेटचात अडकल्या आहेत. सुलोचना (मंत्री पवनराव खिलारी), सुनेत्रा (चेअरमन दसमुकराव तिरसिंगराव), आसरा (कारखान्याचा एम. डी.), कामाक्षी (साहित्यिक दसरतराव आयुधराव) यांच्याशी लेखकाचा येणारा संबंध हा नुसता साक्षीभावापुरता उरत नाही, तर सुलोचना, सुनेत्रा, आसरा यांच्याबाबत तो अधिक खुला आणि त्या तिघींच्या जीवनात आणखी एक नवी स्पेस निर्माण करणारा आहे.

या कादंबरीतला ताण त्याआधीच कोणाच्या तरी पत्नी, उपपत्नी वा रखेली असलेल्या स्त्रियांशी येणाऱ्या लेखकाच्या परिचयामुळे वाढत जाणारा आहे. लेखकाला त्याच्या रिकाम्या आयुष्यात आधी भेटलेल्या नेत्राच्या आयुष्यातदेखील घटस्फोटित असल्याने अशा निराळ्या संबंधात सामोरे जाण्याचा प्रसंग येतो आहे.

परिस्थितीची शिकार बनलेल्या या सर्व स्त्रिया आपल्या अपमानित आयुष्यातदेखील लेखकाच्या निमित्ताने एक वेगळा अवकाश शोधून त्याच्यात प्रेम शोधण्याचा प्रयत्न करतात; पण आधीच्या स्वामित्वाच्या भावनेने राजकीय सत्तेचे प्रतिनिधी त्यांचा 'खेळ' वारंवार नष्ट करतात.

सुलोचनाचे सर्व पाश मंत्री पवनराव खिलारी मृत्यू पावल्यानंतर आणि त्यांच्या दोन दिवट्या चिरंजीवांच्या कार्यकर्तृत्वामुळे नष्ट होतात. त्या लेखकाच्या आयुष्यात येतात; पण सुलोचनाचे आध्यात्मिक गुरुजींशी आधीचेच असलेले नेत्रपल्लवीच्या खेळाचे नाते लेखकाला अमान्य असते, पण ते पवनराव खिलारी यांनीही आधीच अमान्य केलेले असते. हे दोन्ही प्रसंग वेगवेगळ्या प्रसंगी घडूनही ते एकच एक असल्याबाबत वाचताना वाटते.

इथे चोपक फलोद्यानच्या कथानकाचा मोठा गुंता वाचकांसमोर येतो. लेखकाची हत्या झाल्यानंतरच्या काळात तो आपल्याच भटकंतीत गावी येऊन साधू बनून सुनेत्राशी पुन्हा डोळ्याचा खेळ सुरू करतो ते आणि सुलोचनाचे आध्यात्मिक गुरुजींशी असलेले तसेच नाते याचा ओव्हरलॅप वाचकाला संभ्रमात टाकतो आणि त्यातील बऱ्याच सारख्या घटनांच्या बाबींमुळे अनेक पात्रांच्या चेहऱ्यांचे मिळून एका पात्रात एकत्रीकरण होणे हा नवा अनुभव इथे प्रत्ययास येऊ लागतो.

कामात गेलेल्या व्यक्तीने आपल्या जगण्याचा जो धडपडाट मांडला आहे तो येथे अवर्णनीय असाच आहे, कारुण्यपूर्ण आहे. काहीही करून लेखकाला पुन्हा जगायचे आहे; पण त्याला त्याचे कुटुंब, साहित्यिक वर्तुळ, राजकीय सत्ता यांच्याशी संघर्ष करावा लागल्याने वारंवार अपयश येते आहे.

वेगवगळ्या स्त्रिया- नेत्रा, सुनेत्रा, सुलोचना, आसरा यांचा क्षणिक आसरा मिळूनही डाव मोडला गेल्याचे दुःख वेदनादायी आहे. कामाक्षी आणि साहित्यिक दसरतराव





अनुक्रमणिका

आयुधराव यांच्यातील पाहिलेल्या डोळ्यातील खेळाचे चित्रण विद्यार्थिदशेत पाहिल्याने लेखक पुढे चालून तशाच प्रकारच्या खेळाचा एक गडी बनून गेल्याचे अटळ वास्तव कादंबरीत आलेले आहे. विशेष म्हणजे दोघांच्या या खेळावर लेखक म्हणून एक कथा लिहिल्याचादेखील संदर्भ आहे.

कादंबरी अथवा कथेच्या अंतर्गत वास्तवाला खरेपणाचा कुठेना कुठे आधार असतो आणि तो खरा वा महत्त्वपूर्ण मानून लेखक त्याचा आशयद्रव्य म्हणून आपल्या साहित्यकृतीत वापर करतो. हा वापर करताना त्याची असलेली भूमिका साक्षीभावाची असते. वाचकाला नवे काही देऊन त्या जीवनदर्शनाची एक हौस त्याने पार पाडलेली असते. पण या कादंबरीतल्या लेखकाला आपणच मांडलेल्या चित्रणाच्या अनुकरणात अडकावे वाटणे आणि त्यातच अडकून जीवनाचा विनाश घडविणे या बाबी शोकांतिकता व्यक्त करतात.

लैंगिकजीवनाची रुची ही खाद्यपदार्थांच्या चवी घेण्याच्या अनुकरणाइतकी सोपी असते काय, आपले सामाजिक आणि सांस्कृतिक विश्व अशा रुची समाजात रुजविण्याचे कार्य करीत असते काय, असे महत्त्वपूर्ण प्रश्न या निमित्ताने पडत राहतात. लेखकाने ते प्रश्न न ठेवता त्या प्रत्येक वास्तवाचे उपयोजन आपल्या कादंबरीत केलेले असल्याने असा मुद्दा येथे महत्त्वपूर्ण ठरत आहे.

हे 'चोषक फलोद्यान' एक मिथक न उरता हळूहळू वास्तवच ठरत जाते. अनेक तुकड्यांचे असंबद्धपणे एकत्रित येऊन त्यातून पुन्हा एका सलग चित्राचे दृग्गोचर होणे हे वैशिष्ट्य या कादंबरीने साधले आहे. प्रश्न आणि उकल अशी ढोबळ रचना या कादंबरीत मोडीत निघाली असून, प्रश्नच प्रश्न आणि त्यांची उकलच उकल. त्याला कोणताही एक शेवट नाही तशी त्याची कोणतीही एक सुरुवात नाही. कादंबरीचा आरंभबिंदू हा दृश्य उलगडवत नेणारा आहे. तो वाचकाला चकित करतो. आणि कादंबरीचा शेवट जवळ आल्याने पुढे काय असेल या विचाराने वाचक स्वतःला थांबवू शकत नाही. निवेदक जिवंत आहे त्या अर्थी तो कधीच मेला नव्हता, हे सत्य बाकी ठेवत कादंबरीत रचलेले वास्तव पाहिजे तसे प्रवाही राहिले आहे.

आत्मचरित्रात्मक रीतीने उलगडत जाणाऱ्या 'चोपक फलोद्यान' कादंबरीला तसे सत्य वास्तवाचे कणदेखील चिकटले असणे येथे सहज शक्य आहे. कारण त्याच्या असण्याशिवाय कादंबरीला रसरशीतपणदेखील येऊ शकत नाही. मुद्दा आहे तो वास्तवाच्या विरूपीकरणाचा. आणि त्याला आपणच आपल्यातून दूर होऊन बघणे आणि त्याला शब्दबद्ध करताना स्वतःला काही चिकटू न देणे हा कौशल्याचा भाग असला, तरी पण आजवरच्या सर्व लेखनापेक्षा इथे असणारे निवेदक रंगनाथ पठारे हे नेहमीचे निवेदक इथे नाहीत हे ध्यानी घेतले पाहिजे. इथे जगण्यातल्या कित्येक अवघड दुखण्यांच्या जागा त्यांना दाखवायच्या आहेत आणि तशी गुंतवणूक करूनही कलाकृती म्हणून चोषक फलोद्यानचे मूल्य त्यांना गमवायचे नाही. या ताणातून चोषक फलोद्यान असे नवेच मिथक जन्म घेते आणि आपल्याला हव्या तशा पद्धतीने ते जगण्याचे तुकडे जोडीत राहते आणि त्यातूनच एका उत्तम कलाकृतीचा मार्ग मोकळा होतो. संज्ञाप्रवाही कादंबरी लिहिणाऱ्यांच्यात उठून दिसणारी, आत्मचरित्रात्मक कादंबरीच्या रेघेच्या थोडी वर जाणारी आणि आजच्या एकूणच मराठी कादंबरीचा विचार करता एक सरस कादंबरी 'चोषक फलोद्यान'च्या निमित्ताने निर्माण झाली असे म्हणावे लागते.

यात वाङ्मयीन संस्कृतीच्या घटकांची विपरीतता हा एक आशयाचा पदर इथे येऊन जातो. अति जवळचा म्हणून ओळखला जाणाराच सर्वांत मोठा शत्रू ठरतो आणि त्यामुळे आत्मनाश आणि कार्यनाश घडतो. इथे लेखक रामराव पाटील ऊर्फ दादासाहेब यांना मानणारा लेखक असलेला शासकीय अधिकारी 'राजाराम' लेखकाच्या नक त्याच्या नाशाचे षड्यंत्र उभारतो आहे. चेअरमन दसमुखराव तिरसिंगरावसोबत त्याने रचलेले कट-कारस्थान लेखकाला आयुष्यातून उठवीत आहे. 'सीताराम'सारखा नवक वी 'राजाराम'च्या उद्योगाची माहिती लेखकाला पुरवीत आहे. 'दसरतराव आयुघराव'सारखा लेखक आपली विद्यार्थिनी कामाक्षी हिला आपली प्रेयसी बनवीत आहे, तर लेखक रामराव पाटलांच्या वेबसाइटवर लक्षावधी नोंदी असल्याचा तपशील आहे. त्यांना ओळखणारा एक मोठा समुदाय आहे आणि त्या पार्श्वभूमीवर त्यांचे लेखकपण शोभून दिसते आहे. तसेच या कादंबरीच्या पोटात लेखक चोषक फलोद्यान नावाचीच एक कादंबरी लिहीत असल्याचा उल्लेख आल्याने या कादंबरीतले वास्तव दरवेळी आहे त्या पृष्ठीय वास्तवापेक्षा दरवेळी आपले नवे केंद्र बनवून पुन्हा नव्याने गोष्ट सुरू करीत राहते आणि तशातच अनपेक्षितरीत्या ही कादंबरी संपते. तेव्हा वाचक अनेक शक्याशक्यतेच्या हिंदोळ्यावर हिंदकळत राहतो. लेखकाचे निवेदन थांबून वाचक त्याच गतीने आपले निवेदन तिथे सुरू करतो आणि तोही पुन्हा पुढे नव्याने आणिक एखाद्या चोपक फलोद्यान निर्मितीच्या अवस्थेपर्यंत पोचतो, हेच या कादंबरीच्या वास्तवाचे मिथक आहे.

◆

**संतोष पद्माकर पवार**
भ्रमणध्वनी : ९४२२७९६६७८
santoshpawar365@gmail.com



अनुक्रमणिका

## विशेष लेख

गो. मा. पवार

**बालकवींच्या निसर्गकवितेतून तीन प्रकारच्या भाववृत्ती सामान्यतः प्रकट होताना दिसतात. पहिल्या प्रकारच्या कवितेतून निसर्ग आणि कविमन यांच्या एकात्म प्रतीतीतून खळाळून ओसंडणारा आनंद, दुसऱ्या प्रकारच्या कवितेतून सुंदर, चैतन्यमय, आनंदी निसर्ग व दुःखी मानव यातील विरोध व तिसऱ्या प्रकारच्या कवितांत खिन्न, भयाण, भकास निसर्ग व दुःखी मानव यांच्यातील शोकात्म संवाद. या तीनही प्रकारच्या कविता बालकवींच्या मनाला जी निसर्गाची, निसर्गातील चैतन्याची ओढ लागली होती तिच्या संपन्नतेतून वा विफलतेतून निर्माण झालेल्या आहेत.**



केशवसुतांनंतर आधुनिक मराठी काव्यात महत्त्वाचे स्थान मिळविणारे कवी कोण असतील तर ते बालकवी ऊर्फ त्र्यंबक बापूजी ठोंबरे. प्रतिभावंत कवीचे एक खास लक्षण दिसते ते असे, की वेगवेगळ्या काळांत त्याचे मूल्यमापन होतच राहते आणि त्याचा मोठेपणा सांगितला जातो. मात्र, हा मोठेपणा नवनवीन गुणवैशिष्ट्यांसाठी सांगितला जातो. बालकवी हे अशा प्रतिभावंतांपैकीच होत. १९१८ साली बालकवींच्या 'फुलराणी', 'निर्झरास' यासारख्या कवितांबद्दल रेव्हरंड नारायण वामन टिळक म्हणतात. 'या त्यांच्या कविता त्यांच्याच म्हणून अर्वाचीन विदग्धवाङ्मयात निरंतर शोभणाऱ्या आहेत. कल्पनांचे सहजपण, रचनेचे सारल्य आणि माधुर्य हे त्यांच्या कवितेचे गुण म्हणजेच त्यांनाच ईश्वराकडून मिळालेली संपत्ती होती.' तीसेक वर्षांनंतर, १९५० मध्ये काव्यात नवीनता कशामुळे येते याबद्दल भावनानिष्ठ समानतेचा सिद्धांत मांडताना बा. सी. मर्ढेकर विवेचनाच्या ओघात सांगतात, 'प्रतिभाधर्माने खरा नवीन कवी फक्त एकच, पहिला आणि शेवटचाही, तिशीच्या आत दिवंगत झालेले बालकवी.' नंतर आणखी दहा वर्षांनी बालकवींचे कलावंत म्हणून असामान्यपण शोधताना गंगाधर गाडगीळ त्यांच्या संवेदनाप्रधानतेचे, त्यांच्या बालवृत्तीचे, त्यांच्या शैलीचे विशेष ध्यानात घेतात. बालकवींच्या थोरवीबद्दल या वेगवेगळ्या कारणमीमांसा भिन्न असेल. मात्र, त्यांच्या थोरवीबद्दल सगळ्यांचे एकमतच आढळते.

मराठी काव्यात बालकवींनी हे जे स्थान निर्माण केले ते अपूर्व म्हणावे लागेल ते दुसऱ्याही कारणासाठी. ज्याला काव्यलेखनाची तपश्चर्या म्हणता येईल ती करण्यासाठी प्रदीर्घ आयुष्यही बालकवींना लाभले नाही. फार थोड्या कालावधीतील त्यांचे हे कवितालेखन आहे. त्यांचा जन्म १८९० सालचा. १९०७ मध्ये जळगावच्या कविसंमेलनात हा सोळा वर्षांचा मुलगा धीटपणाने स्वतःची समयस्फूर्त कविता म्हणतो व सभा जिंकतो. रेव्हरंड टिळकांची शाबासकी व प्रेम मिळवितो व अध्यक्ष कर्नल कीर्तिकरांकडून 'बालकवी' ही पदवी मिळवितो. ह्या घटनेला उणीपुरी दहा वर्षे होतात न होतात तोच म्हणजे १९१८ साली त्यांना अपघाती मरण आले. वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षापर्यंत व दहा-बारा वर्षांच्या अवधीत जेमतेम दीडशे कविता लिहून बालकवींनी मराठी काव्यात स्वतःसाठी

# बालकवींच्या निसर्गकवितेतील बदलते भावविश्व

स्थान निर्माण करावे ही गोष्ट निश्चितपणे त्यांच्या असामान्य प्रतिभागुणाची निदर्शक म्हणावी लागेल.

बालकवी म्हटल्याबरोबर त्यांची वैशिष्ट्यपूर्ण अशी निसर्गकविता कोणाही रसिकाच्या डोळ्यांसमोर येणार. मात्र, बालकवी हे निसर्गाचे कवी होते याचा यथायोग्य अर्थ समजून घेतला जात नाही तर गफलत होण्याची शक्यता आहे. निसर्गातील वस्तूंकडे ते काव्याचे विषय म्हणून पाहत होते व नुसत्या निसर्गवर्णनापेक्षा निसर्गातील गोष्टींवर मानवी भावनांचा आरोप केल्याने अधिक काव्य येते, या समजुतीखातर ते तसे अलंकरण करीत होते असे समजणे यथायोग्य होणार नाही. बालकवींचे म्हणून असलेले व्यक्तिमत्त्व ध्यानात घेतले तर त्यांचे निसर्गाशी असलेले आंतरिक नाते, त्यांची बालवृत्ती व त्यांच्या काव्यातून प्रकटणारे शैलीचे विशेष यांचा एकमेळ झाला होता हे जाणवते.

निसर्गातील वस्तूंवर मानवी भावनांचा आरोप करणे, ही बाब अलंकरणाची क्लृप्ती म्हणून बालकवींच्या कवितेत येत नाही. आपण हे लक्षात घेतले पाहिजे, की बालकवी हे स्वभावत: रोमँटिक कवी होते, आणि आपण व निसर्ग, आपण व सर्व प्राणिसृष्टी यांत एकात्मता अनुभवणे हा रोमँटिक जाणिवेचा गाभा आहे. म्हणून निसर्गातील वस्तूंमध्ये चैतन्य पाहणे व ते अनुभवणे ही रोमँटिक कवींची आंतरिक प्रतीती होती. ते त्याचे अध्यात्म होते. मनाच्या एका आंतरिक ओढीने अत्यंत स्वाभाविकपणे ते निसर्गाकडे जात होते. त्यांच्या मनाची ओढ कोणती होती याची कल्पना 'बालविहग' या कवितेवरून येऊ शकते.

*'सुंदरतेच्या सुमनावरचें दव चुंबुनि घ्यावें*
*चैतन्याच्या गोड कोंवळया उन्हांत हिंडावें*
*प्रीतिसारिका गीत तियेचें ऐकावें कानीं*
*बनवावें मन धुंद रंगुनी काव्यसुधापानीं'*

सौंदर्य, चैतन्य आणि प्रेम यांचा ध्यास त्यांना लागला होता. त्यांचा हा ध्यासच त्यांच्या निसर्गकवितांमधून विविध रूपे घेऊन प्रकट होतो. बालकवींच्या कवितेतील स्थित्यंतरे आणि त्यांची स्वत:ची वृत्त्यंतरे त्यांच्या या आध्यात्मिक निसर्गविषयक जाणिवेशी निगडित आहेत असे आढळून येते.

बालकवींच्या निसर्गकवितेतून तीन प्रकारच्या भाववृत्ती सामान्यतः प्रकट होताना दिसतात. पहिल्या प्रकारच्या कवितेतून निसर्ग आणि कविमन यांच्या एकात्म प्रतीतीतून खळाळून ओसंडणारा आनंद, दुसऱ्या प्रकारच्या कवितेतून सुंदर, चैतन्यमय, आनंदी निसर्ग व दु:खी मानव यातील विरोध व तिसऱ्या प्रकारच्या कवितांत खिन्न, भयाण, भकास निसर्ग व दु:खी मानव यांच्यातील शोकात्म संवाद. या तीनही प्रकारच्या कविता बालकवींच्या मनाला जी निसर्गाची, निसर्गातील चैतन्याची ओढ लागली होती तिच्या संपन्नतेतून वा विफलतेतून निर्माण झालेल्या आहेत.

निसर्ग चैतन्यमय आहे, प्रेमपूर्ण आहे, आनंदमय आहे अशी बालकवींना जोपर्यंत प्रतीती येत होती तोपर्यंत त्यांची कविता चैतन्याने स्फुरण पावत होती व प्रेममयतेने व आनंदाने ओसंडत होती, आणि 'आनंदी आनंद गडे, जिकडे तिकडे चोहीकडे' ही त्यांची प्रतीती होती. 'अरुण' या कवितेत 'हा प्रेमाचा लोंढा वरुनी आला हो आला / भव्य गिरिंनो! निजशिखरावर झेलुनि घ्या याला' असे विश्वातील प्रेममयतेचे व चैतन्याचे ते वर्णन करतात. 'निर्झरास', 'संध्याराणी', 'फुलराणी', 'तारकांचे गाणे' इत्यादी बालकवींच्या कवितांतून कविमन आणि निसर्ग यांच्या एकात्मतेच्या प्रतीतीतून अनुभवाला येणाऱ्या आनंदाचे मुक्त गान आहे. कवीचे मन आनंदाने, उल्हासाने ओसंडून चालल्याचे जाणवते. हा आनंद बालसुलभ म्हणून निरागस आणि उत्कटही आहे. बालवृत्तीनेच ते निसर्गातील चैतन्याचा अनुभव घेत असल्याने त्यांच्या अनुभवाला बालसुलभ स्वरूप प्राप्त होताना दिसते. बालकवी नवतीच्या वयापासून अनुभव घेतात, असे



**बालकवींचा निसर्गाकडे पाहण्याचा एक दृष्टिकोन होता असे म्हणणाऱ्यांपेक्षा निसर्ग भावण्याची बालकवींची एक वृत्ती होती. त्यांचे एक अध्यात्म होते म्हणणे योग्य. याच्या जोडीलाच त्यांच्या ठिकाणी कवीचा श्रेष्ठ प्रतीचा प्रतिभाधर्म होता. म्हणून बालकवींनी अपूर्व अशी श्रेष्ठ दर्जाची निसर्गकविता लिहिली. त्यांची कवी म्हणून थोरवी त्यातच आहे.**

माधवराव पटवर्धनही म्हणतात. परंतु या वैशिष्ट्यामुळेच 'फुलराणी', 'संध्याराणी' यांसारख्या नितांतरमणीय कविता बालकवींच्याकडून लिहिल्या गेल्या.

*'हिरवे हिरवें गार गालिचे -*
*हरित तृणांच्या मखमालीचे*
*त्या सुंदर मखमालीवरती -*
*फुलराणी ही खेळत होती.*
*गोड निळ्या वातावरणात -*
*अव्याज मनें होती डोलत;*
*प्रणयचंचला त्या भ्रूलीला -*
*अवगत नव्हत्या कुमारिकेला!*
*आईच्या मांडीवर बसुनी -*
*झोंके घ्यावे, गावीं गाणी;*
*याहुनि ठावें काय तियेला -*
*साध्या भोळ्या फुलराणीला?'*

यातील निसर्गवर्णन, कवीने निर्माण केलेले कल्पितस्वरूप व कवीची वृत्ती ह्या सगळ्याच गोष्टी मराठी कवितेला दुर्मिळ व अपूर्व होत. बालकवींनी निर्माण केलेले, म्हणजेच त्यांनी अनुभवलेले निर्झर, तारका, रजनीदेवी, रजनीनाथ, पश्चिमा, फुलराणी यांचे जग चैतन्याने रसरसणारे, प्रेमाने ओसंडणारे व सौंदर्याने परिपूर्ण भरलेले आहे. आपण आणि निसर्ग एकरूप आहोत, निसर्गाचा आणि आपला जिवाभावाचा संवाद होतो आहे, अशी बालकवींना जोपर्यंत प्रतीती येत होती तोपर्यंतच त्यांच्याकडून अशा कविता निर्माण झाल्या.

बालकवींची दुसऱ्या टप्प्यावरील कविता वेगळी जाणीव प्रकट करते. निसर्ग सुंदर, चैतन्यमय, आनंदी आहे खरा; परंतु आपण त्याच्याशी समरस होऊ शकत नाही. त्या चैतन्याचा, स्वातंत्र्याचा अनुभव घेऊ शकत नाही, अशी खंत वाटत असल्याने एक प्रकारचा ताण कवीच्या मनामध्ये निर्माण झालेला आहे. 'बालविहग' या कवितेत ते म्हणतात,

*'सुंदरतेच्या मोहनात मन अमुचेंही नाचे*
*बंधहि होती शिथिल, हरपतें भानहि जगताचें.*
*जीव ओढतो वर वर जाया चैतन्यासाठीं*
*हाय! सुटेना दृढ देहाची परि बसली गांठी!*
*दिव्यानंदीं म्हणुनि उमाळा दुःखाचा वाटे*
*सत्यहि जो आनंद कल्पनामय केवळ वाटे.'*

बालकवींच्या 'आनंदी पक्षी', 'सृष्टीच्या गायकास', 'निराशा' इत्यादी कवितांमध्ये आपण आणि निसर्ग यामध्ये द्वैत निर्माण होत चालले आहे, निसर्गापासून आपण दुरावत चाललो आहोत, या जाणिवेमुळे येणारी औदासिन्याची भावना प्रकट होताना दिसते.

बालकवींची तिसऱ्या टप्प्यावरची निसर्गकविता दुःखाच्या जाणिवेने पूर्ण काळवंडलेली आहे. आता मानवही दुःखी व निसर्गही भयाण, भकास स्वरूपात बालकवींना प्रतीत होतो. ज्या पाखराला कधीच कोणी गायिलेले नाही त्या पाखराचे करुण गीत बालकवी आळवतात. 'फरारा गोफण फिरवून काटच्यावर तुझे भग्न हृदय उपडे पाडणारा एक सौख्याचा दिवस येईल आणि तो तुझ्यासह तुझ्या गीताचा अंत करील' असला भयंकर विरोधाभास ते कवितेच्या शेवटी वर्णन करतात. आता ते हर्षोत्फुल्ल 'संध्यारजनी'चे वर्णन करीत नाहीत. त्यांना आता संध्याकालीन निसर्ग प्रतीत होतो तो असा :

*'श्रमलें दमलें वणवण फिरुनी गगनीं रविकर जाल*
*शिणल्या सुंदर सांध्यदेविचें घे घर्मांकित भाल*
*शिणले मारुत, खिन्न पयोधर दुर्धर साहुनि ताप*
*शून्य गिरिदरी, जर्जर निर्झर गळती आपोआप*
*उदासवाणें एकच गाणें शून्य मनें वनराई*
*घोळित राही, लागुनि तंद्री शीण भरे तद्देहीं*
*शिणली काया, शिणली माया, शिणले लोकाचार*
*सौख्यहि शिणले, दुःखहि शिणले, शिणले तत्त्वविचार.'*

ह्या नैराश्याच्या जाणिवेचे खिन्न-नीरस एकान्त गीत गाणाऱ्या पारव्याचे ते वर्णन करतात. खेड्यातील अकाळ रात्रीच्या घोर प्रहराचे वर्णन ते करतात.

बालकवींची निसर्गकविता अशी तीन रूपे धारण करणारी आहे आणि ह्या तीनही प्रकारच्या रूपांच्या कवितेचा स्रोत आहे तो बालकवींच्या निसर्गविषयक जाणिवेत. बालकवी निसर्गाचे कवी आहेत असे म्हणताना त्यांच्या निसर्गविषयक कवितेचे हे स्वरूप ध्यानात घ्यावे लागते.

बालकवींच्या कवितेला सौंदर्य प्राप्त करून देणाऱ्या काही गुणविशेषांचा उल्लेख करणे तरी आवश्यक आहे.

अनुक्रमणिका

कवी हे शब्दसृष्टीचे ईश्वर असतात, या विधानाचा अर्थ प्रत्ययाला येतो तो बालकवींसारख्या कवींमुळे. शब्दांच्या अर्थच्छटा ते जागृत करू शकतात. एवढेच नव्हे, तर शब्दातील नादात्म लयींचा उपयोग आशय संपन्न करण्यासाठी अत्यंत स्वाभाविकपणे ते करून घेतात त्यांच्या शब्दयोजनेत नादमाधुर्य तशीच सूक्ष्म तालबद्धता आहे.

*'अस्तगिरीच्या अभिनव कुंजीं निजला निजनाथ,'*
*यासारख्या ओळीत नादमयतेचे, तर*
*'ऐलतटावर पैलतटावर हिरवाळी घेऊन*
*निळासांवळा झरा वाहतो बेटाबेटांतुन'*

यांसारख्या स्वनेतून तालबद्धतेचा सूक्ष्म प्रत्यय आपल्याला सहजपणे येतो. 'औदुंबर' ही सगळीच कविता घ्या, की बालकवींच्या इतर कुठल्याही कवितेतील

*'फिकट निळीने रंगविलेला कापुस मेघांचा*
*वरूनि कुणी गुलजार फिरवला हात कुसुंब्याचा'*

यांसारख्या ओळी घ्या, विविध संवेदना जागृत करण्याचे सामर्थ्य बालकवींच्या शब्दांत कसे आहे याचा प्रत्यय येतो. निसर्गाचे दर्शन घेताना बालकवींचे व्यक्तिमत्त्व प्रथमत: केवळ संवेदनामय होते, असे गंगाधर गाडगीळांनी म्हटले ते सार्थ आहे.

बालकवींनी वर्णिलेला अरुण कोठे पाहिला, असा आक्षेप प्रा. ग. स. भाटे यांनी घेतला आहे, तर बालकवी निसर्गाला बोन्सायप्रमाणे लघुरूप देतात, असे अलीकडच्या एका टीकाकाराने म्हटले आहे. बालकवींचे निरीक्षण किती सूक्ष्म होते व ते किती यथातथ्य चित्रण करू शकतात ते 'औदुंबर', 'श्रावणमास' यांसारख्या कवितांवरूनही दिसू शकले. बालकवींच्या प्रतिमावापराचा नवेपणा मर्ढेकरांना एवढा जाणवला, की ते त्यांना मराठी कवितेत एकमेव स्थान देऊन टाकतात.

बालकवींचा निसर्गाकडे पाहण्याचा एक दृष्टिकोन होता असे म्हणणाऱ्यांपेक्षा निसर्ग भावण्याची बालकवींची एक वृत्ती होती. त्यांचे एक अध्यात्म होते म्हणणे योग्य. याच्या जोडीलाच त्यांच्या ठिकाणी कवीचा श्रेष्ठ प्रतीचा प्रतिभाधर्म होता. म्हणून बालकवींनी अपूर्व अशी श्रेष्ठ दर्जाची निसर्गकविता लिहिली. त्यांची कवी म्हणून थोरवी त्यातच आहे. मराठी कवितेच्या परंपरेत बालकवींचे स्थान निश्चित करताना रा. श्री. जोग त्यांच्या 'धर्मवीर'सारख्या केशवसुतांचे अनुकरण करणाऱ्या कवितेचा उल्लेख करून म्हणतात, केशवसुत संप्रदायाचे निशाण त्यांना नीट पेलले नाही. तसे असेलही. मात्र, ही गोष्ट खरी, की बालकवींनी आपल्या प्रतिभाबळावर स्वत:चे निशाण मराठी कवितेच्या प्रांगणात सदैव फडफडत ठेवले आहे.

◆

**डॉ. गो. मा. पवार**
भ्रमणध्वनी : ९४२०५४६७१४



## मालिका
# समकालीन कवी

**मराठी कवितेच्या प्रवाहात आज अनेक समकालीन कवी-कवयित्री आपल्या अनुभूतीची ओंजळ रिती करून हा प्रवाह अधिक खोल व व्याप्त करत आहेत. जीवनाच्या व्यामिश्रतेला सामोरे जात जगण्याच्या मुळांना, पर्यायाने व्यापक मानवी जाणिवांना भिडण्याचा प्रयत्न ते करताना दिसत आहेत. अशा काही आश्वासक समकालीन कवी-कवयित्रींनी स्वतःच्याच कवितेवर केलेले भाष्य व जाणकारांनी त्यांच्या कवितेचा घेतलेला परामर्श या मालिकेतून मांडत आहोत.**

**या अंकात कवी दिनकर मनवर.**

---

१.

**फुलपाखरू, मी आणि खोलीतला निवांतपणा**

*फुलपाखरू, मी आणि*
*खोलीतला निवांतपणा*
*केवळ एवढी एकच ओळ सुचली,*
*नंतर काहीच नाही*
०००
*नंतर निवांतपणा याऐवजी*
*एकाकीपण असं सुचलं*
*नंतर ओळ अशी झाली :*
*फुलपाखरू, मी आणि खोलीतलं*
*एक क ीपण*
०००
*दरम्यान काहीच सुचलं नाही*
*कोरा करकरीत करकोच्या*
*मनात येत गेला*
*दरम्यान फुलपाखरू*
*अस्वस्थ होऊ न*
*भिरभिरत राहिलं खोलीत सर्वत्र*
०००
*दरम्यान इंद्रधनुष्याखालून बरंच*
*पाणी वाहून गेलं*
*दरम्यान माझ्या नकळत*
*काळही सुटून गेला*
*दरम्यान एक खिडकी उघडी होती*
*दोन्हीक ड नं*
*एकीकडनं अंधार येऊ पाहत होता*
*आतमध्ये*
*नि बाहेर पडण्यासाठी उजेड*
*रांगत होता दुसरीकडनं*
०००
*दरम्यान माझ्यावर*
*शैवाळ साचत गेलं*
*दरम्यान खिडकीतून*
*फुलपाखरू उडून गेलं*
*दरम्यान एकाकीपणावर*
*बुरशी चढत गेली*
०००
*नंतर एकाकीपण खोलीतलं,*
*मी आणि शैवाळलेली बुरशी*
*अशी ओळ झाली*
०००
*दरम्यान एकाकीपणावरही*
*बुरशी चढत गेली...*

२.

**काहीच न सुचण्याच्या दृश्यात**

मला माझ्या क वितेविषयी लिहायचं आहे, पण काहीच सुचत नाहीये. दरम्यान, वरील क वितेत एका कवीची जी अवस्था झाली तशीच काहीशी अवस्था माझी झाली आहे. मला काहीच सुचत नाही. मी निव्वळ वाट पाहत खिड कीतून बाहेर पाहतोय बाहेरच्या दृश्यात पाऊस पडण्याची शक्यता असूनही पाऊस पडत नाही आणि मी इकडे अधिकाधिक कोरडा होत खोल खोल तळाशी जात राहतो. असं काहीच न सुचण्याच्या दृश्यात किती तरी वेळ पडून राहतो. नंतर केव्हा तरी सहा महिन्यांच्या गाढ झोपेतून जागं व्हावं तसा राक्षसारखा झोपेतून जागा होतो. दरम्यान, माझी सगळी वही सुकून गेल्याचं दृश्य माझ्यासमोर हळूहळू तरंगत

# मी सतत कवितेच्या शोधात असतो...

दिनकर मनवर

उमलून वर येतं आणि आकाशात सर्वत्र काळे कावळे काव काव करत माझ्या सभोवती घिरट्या घालताना दिसून येतात. मग मी माझा जीव ज्यात दडवून ठेवला होता त्याचा शोध घेतो, तर हजारो कावळे त्याचे लचके तोडताहेत असं दिसून येतं. मग माझी झोप पार उडून जाते. मी काहीच न सुचण्याच्या दृश्यात असहाय होऊन वाट पाहत पडून राहतो. मला काहीच सुचत नाही.

३.

**पुन्हा माझ्या आत एकाकीपणाची बुरशी**

दरम्यान, केव्हा तरी मी उठून आरशासमोर उभा राहून स्वतःचं प्रतिबिंब न्याहाळत राहतो. माझ्या डोक्याचे केस खूप वाढले असल्याचं दिसून येतं. गेल्या काही दिवसांपासून मी माझ्या हातापायांची नखं काढली नसल्याने खूप वाढली आहेत आणि डोक्याचा एकही केस पांढरा झाला नाही तरी मिशा मात्र पार पांढऱ्या झाल्याचं दिसून येतं. खरं तर असं काही आठवणं किंवा सुचणं यांचा काही एक संबंध नसताना असंबद्ध सुचत राहिल्याने मी अधिकाधिक अस्वस्थ होत जातो. मला काहीच सुचत नसल्याने पुन्हा माझ्या आत एकाकीपणाची बुरशी वाढत जाते नि मी पलंगावर अस्वस्थ होऊन बसून राहतो आणि पलीकडे आरशातला तो निवांत आहे. मला काहीच सुचत नसताना पलीकडे आरशात त्याची वही मात्र भरभरून वाहत राहते. माझी भाषेच्या मायाजालातून सुटका होत नाही आणि त्याला इकडच्या जगात येण्यासाठी मुक्ती हवी आहे. मग मी उठून खिडकीतून बाहेरचं दृश्य पाहत राहतो. दरम्यान, आकाशात ढगांची गर्दी वाढून पाऊस पडण्याचं दृश्य उमलून येतं. मग हळूहळू मला प्रसन्न वाटायला लागून माझी वही भिजून जाते.

४.

**असंबंद्ध लिहिण्यातून मुटकेचा असहाय प्रयत्न**

मला माझ्या कवितेविषयी लिहायचं आहे, पण मी भलतंच काही तरी लिहितोय असं वाटून पोटात भीतीचा गोळा उठतो. दरम्यान, मी वर लिहिलेलं वाचत राहतो. असं का लिहिलं किंवा या क्षणी असं का सुचलं याचा विचार करतो. असं असंबद्ध लिहिणं वा सुचणं याविषयी विचार करत करत मी माझ्या मुळांकडे जात राहतो. आपली मुळं भूतकाळात अडकली असून आपण मात्र वर्तमानाच्या अवकाशात वाढत अनिश्चित भविष्याकडे चालत राहतो असं जाणवत राहतं.

माझ्या कवितेतील जीवसृष्टींचा शोध घेताना मला पार भूतकाळाची जमीन खरडावी लागते. कुठे रुजलो, कुठे वाढलो, कुठली जीवद्रव्यं शोषत वाढत, खुरडत इथपर्यंत येऊन पोहोचलो याचा अदमास घेताना मला माझ्या जन्मापासूनच्या जगण्याचा तसेच आदिबंधात दडून असलेल्या अनुवांशिकतेचाच आधार घेण्याशिवाय पर्याय उपलब्ध असत नाही. मी माझ्याच चरित्राचा चतकोर तुकडा चघळत बसून राहतो.





अनुक्रमणिका



५.

## कवीच्या अवाचनीय चरित्राचा चतकोर तुकडा

नकाशावर गाव नसलेल्या आणि परिचित नाव नसलेल्या गावात मी जन्माला आलो. खेड्यातील बहुतांश मुलांचं बालपण जसं खेड्यात आणि गरिबीत जातं तसंच माझंही बालपण गेलं. त्यात सांगण्यासारखं वेगळं असं काही नाही. तरीही काही तरी वेगळं वाट्याला येतं तसं माझ्याही वाट्याला आलं. घरी प्रचंड गरिबी. त्यात बापाचं गावातल्या गावात एकामागून एक घरं बदलत राहणं यामुळे पुरतं स्थिर अंगण आणि घरपण वाटचाला आलं नाही. आणि गाव तर एवढं छोटं आणि त्यात दोन-चार जातींचे लोक. त्यामुळे माणसाचं जगणं, त्याची ससेहोलपट, यातना, प्रेम, वैर, भांडण, आजारपण, मृत्यू आदी सगळं अगदी जवळून अनुभवता आलं. नाही म्हटलं तरी गावाच्या बाजूला पसरलेलं विस्तीर्ण दाट जंगल आणि वाहणारी पावसाळ्यातील छोटीशी नदी (जी उन्हाळ्यात हमखास आटायची) यांचा माझ्या जगण्याशी संबंध येत गेला. गाव उंचावर असल्याने गावात एकही विहीर नव्हती. ज्या दोन-चार होत्या त्याही गावापासून दूर. उन्हाळ्यात मात्र या विहिरी हमखास आटायच्या. मग पाण्यासाठी पायपीट. रात्री-वेरात्री कुणालाही कळू न देता काळोखात दूरच्या विहिरीत उतरून विहिरीतील झऱ्याजवळ बसून ओंजळीने पाणी घड्यात भरून मायच्या किंवा बहिणीच्या सोबत पाणी आणणं, हे अजूनही मनाच्या कप्प्यात घर करून आहे. त्यामुळे पाण्याची चव आणि त्याची महती बालपणीच कळून चुकली. माझ्या जन्मानंतर बापाला दमा झाला. त्यांनी पुढे काम सोडलं. सगळ्या घराची जबाबदारी मग आई आणि मोठ्या बहिणीवर येऊन पडली. दुष्काळी दिवसांत कुठे रोजगार हमीच्या कामावर अथवा वेगवेगळ्या धरणांच्या कामावर आम्हाला मोठं केलं. हे असं असलं, तरी मुलांनी शिकून मोठं व्हावं, स्वतःच्या पायावर उभं राहावं, कुणापुढे हात पसरू नये, इमानेइतबारे जगावं यासाठी त्यांनी कायम प्रयत्न केले. त्यात गावात तिसरीपर्यंतच शाळा. शिक्षक ब्राह्मण होते. त्यांना आमच्याकडचं काहीच चालायचं नाही. मात्र मुलांना ते मन लावून शिकवत. त्यात अभ्यासासोबतच त्यांनी आम्हाला रामायण-महाभारतातल्या गोष्टी सांगून माझं बालपण समृद्ध केलं. शाळेला सुट्टी असली की मी आईसोबत मजुरीने निंदण-खुरपणासाठी जायचो. उन्हाळ्यात धरणाच्या कामावरही जात असे. त्या वेळी आई वेगवेगळ्या गोष्टी सांगून मन रमवायची. त्यामुळे कामाचा ताण नाहीसा व्हायचा. त्यात मला राजपुत्र, पऱ्या, राक्षसांच्या गोष्टी वाचायचा नाद लागला. मात्र, या काळात मला कधी कविता शिवली नाही किंवा मी पुढे कधी तरी कविता लिहीन असं मला वाटलं नाही. पाठ्यपुस्तकातील कवितेपुरताच माझा कवितेशी संबंध आला.

मग पुढे शिक्षणासाठी वेगवेगळी गावं, होस्टेलात राहणं असं करत करत शेवटी एका ऐतिहासिक शहरात दाखल झालो. साधारणतः १९८४ चा तो काळ असावा. बेगमपुऱ्यातील बिस्मिल्ला बीचा वाडा. त्यात एका खोलीत चार-चार, पाच-पाचजण राहायचे. सारेच गावाकडून येऊन शिष्यवृत्तीवर शिकणारे. सकाळी उठून आक्रम हॉटेलात चहा-सिगारेटी पीत वर्तमानपत्र वाचणं, जुनी गाणी-गझला ऐकणं. नंतर दुपारी दूर पायपीट करत कॉलेज. रात्री उशिरा जागून सिगारेट आणि चर्चा, असं जगत दिवस कटायचे. त्यात रत्नाकर, महेंद्र भवरे यासारखे मित्र कविता लिहायचे. शिवाय विद्यार्थी चळवळी, मोर्चे आजूबाजूला. अशा वातावरणात 'युवामन' नावाचं अनियतकालिक काढलं. विद्यापीठाच्या वाचनालयात वेळात वेळ काढून वाचन. खरं तर या शहरात आल्याने पहिल्यांदाच दलित साहित्याची ओळख झाली. त्यामुळे आत्मभान जागृत झालं. तसंच नेमाड्यांच्या कादंबऱ्या वाचत गेलो. याच दरम्यान दलित कविता आणि साठोत्तर पिढीतील सगळ्या कवी-लेखकांच्या साहित्याचं वाचन वाढत गेलं. त्यात प्रामुख्याने ढसाळ, सुर्वे, तसंच नेमाडे, चित्रे, कोलटकर, ओक, सारंग, डहाके, चंद्रकांत पाटील, ग्रेस, महानोर, तुळशी परब, काळसेकर यांच्या कविता वाचून दिशा मिळत गेली. सारंगांच्यामुळे विश्व-साहित्यातील कामू, सार्त्र, काफ्का, बेकेट यांचीही ओळख होत गेल्याने अस्तित्वविषयक प्रश्नांची जाण आली. याच काळात पैठण गेटला रशियन साहित्याची पुस्तकं स्वस्तात मिळायची. ती पुस्तकं विकत घेऊन वाचायचा नाद लागला. त्यात प्रामुख्याने मॅक्झिम गॉर्की, अंतोन चेकॉव्ह, दोस्तोव्हस्की यांच्या साहित्यामुळे जाणिवा प्रगल्भ होत गेल्या. सामान्य माणसाविषयी, त्याच्या जगण्याविषयी, गरिबी आणि शोषणाविषयी आपणही काही लिहावं असं आतून वाटत राहायचं. मग काही काळ चळवळ, मोर्च्यात सामील झालो. कवी संमेलन, मुशायऱ्यात जाऊन कविता ऐकल्या. मग याच काळात इतरांसारखी मीही कवितालेखनाला सुरुवात केली. परंतु तत्कालीन प्रवाह आणि प्रभावातून आलेल्या त्या कविता असल्याने गंभीर होत्या असं वाटत नाही.

पुढील काळात नोकरीनिमित्ताने स्थलांतरण होत गेलं. शहरं बदलत गेली. नवनवीन माणसं भेटत गेली. १९९८ च्या सुमारास बुलडाणा शहरात दाखल झालो आणि कवितेच्या अधिक जवळ आलो. तहान लागल्यावर माणूस

**दिनकर मनवर हे समकालीन महत्त्वाचे कवी असून त्यांचा 'दृश्य नसलेल्या दृश्यात' हा कवितासंग्रह पॉप्युलर प्रकाशनाच्या वतीने प्रकाशित झाला आहे.**



पाण्याजवळ जातो तसा मी कवितेजवळ गेलो. बुलडाण्यातून कवितेला वाहिलेलं 'शब्दवेध' अनियतकालिक निघायचं. त्यातील दा. गो. काळे, मनोज, प्रकाश, रवी, रमेश, गजू, दिनकर, अनिल, मंगेश, बापू या मित्रांच्या सहवासात आल्याने कवितेविषयी गंभीरपणे विचार करायला लागलो. कवितेचा रूपबंध, भाषा, प्रतिमा, प्रतीकं याबाबत अधिक जागरूक होऊन लिहू लागलो. साठोत्तर पिढीतील कवी आणि 'शब्दवेध'मधील मित्रांनी माझी कवितेविषयीची समज अधिक समृद्ध केली. त्यामुळे कवितेच्या माध्यमातून आपली मुळं शोधण्याचा प्रयत्न केला.

६.

**उपकथानकातील पात्राचे प्राक्कथन**

मागील दोनेक दशकांपासून मी कविता लिहितो आहे. सुरुवातीला कविता लिहिणं एवढंच माहीत होतं. त्याचा आपल्या जगण्याशी, जगाशी, निसर्गाशी काय संबंध असतो हे समजायचं नाही. निव्वळ शब्दांशी खेळत कविता करणं असायचं. कवीला हळूहळू सभोवतीचं जग जसजसं समजत जातं तसतसं कवितेतील शब्द, प्रतिमा, प्रतीकं, भाषा याविषयीच्या अर्थाशी अधिक सजग राहून कविता लिहायची असते. एखाद्या व्यक्तीला जेवढं जग दिसेल तेवढीच त्याची समज असू शकते. मात्र, कवीला जेवढं दिसतं, त्यापलीकडे जाऊन स्वतःला येणारे अनुभव, त्यांचा वर्तमानाशी संबंध यांचा सारासार विचार करून कवितेला आकार द्यायचा असतो. त्यातील प्रतिमा-प्रतीकांचाही जाणीवपूर्वक वापर करून कविता अर्थसघन कशी होईल याची दक्षता घ्यावी लागते.

मी कविता का लिहितो याचं उत्तर प्रत्येक कवी आपापल्या पद्धतीने देऊ शकतो. मी का जगत आहे याचं जसं एक व्यक्ती म्हणून जन्म-मृत्यूच्या दरम्यान ज्या ज्या गोष्टी करायच्या असतात (उदा. कुटुंबाचं पोषण, मुलांचं शिक्षण, आजारपण, सुरक्षित जगण्यासाठीची धडपड, म्हातारपणाची तजवीज आणि जगताना मौजमजा आनंद मिळणं यासाठी कष्ट करणं इत्यादी) त्या करत शेवटी मुक्ती मिळवणं, असं उत्तर असू शकतं. मात्र, कवीच्या बाबतीत असं असू शकत नाही. प्रत्येक कवी कविता लिहिताना, कविता का लिहितो, त्याच्या प्रेरणा काय असतात याची त्याला निश्चित जाण असावी लागते. एवढंच नाही, तर त्याला त्याची कविता घडवताना तो वापरत असलेली कवितेची भाषा, प्रतिमा यांचाही जाणीवपूर्वक वापर करून आपली कविता अधिक प्रभावी व अर्थपूर्ण होऊन त्याचा समाजमनावर इष्ट परिणाम होऊन इच्छित उद्दिष्ट साध्य करायचं असतं.

सामान्य माणूस, त्याचं जगणं, दुःख, यातना, त्याला पडणारे प्रश्न, व्यवस्थेकडून त्याचं होणारं शोषण या गोष्टी कवितेच्या केंद्रस्थानी ठेवून मी कविता लिहिण्याचा प्रयत्न करतो. मला बुद्धाची महाकारुणिकता, दुःखनिरोध, मानवाचं परस्परांशी सौहार्दाचं नातं, त्याच्या चिंता, जगण्यासाठी होणारी दमछाक, तृष्णेच्या आसक्तीतून बाहेर पडण्याची धडपड, भेदभावमुक्त व शोषणविरहित समाजनिर्मिती आणि शेवटी निर्वाणाची प्राप्ती, या प्रेरणा माझ्या कवितेच्या मुळाशी आहेत. मी बुद्ध होऊ शकत नाही, मात्र सिद्धार्थ जाणीव सतत ठेवून मी या सगळ्या गोष्टींच्या मुळाशी जाऊन माणसाचा शोध घेत राहतो आणि माणूस बनून माणसांशी अधिकाधिक चांगले कसं वागता येईल याचा प्रयत्न करत राहतो. हेच खरं तर माझ्या कवितेचं मूळ आहे.

७.

**निसरड्या वर्तमानात कविता होणे**

नव्वदनंतर जागतिकीकरणाचे चांगले तसेच वाईटपरिणाम दिसायला लागले. प्रस्थापित व्यवस्था कोलमडून नवनवीन व्यवस्था तयार होत गेल्या. माहितीचा स्फोट झाला. जग अगदी हाकेच्या अंतरावर आलं. रोजगाराच्या नवीन संधी निर्माण झाल्या. मात्र, यामुळे नवीन वर्ग तयार होत गेले. माणसाचं वस्तूत रूपांतर झालं. आपल्या अवतीभवतीचं जे अफाट जग आहे ते भविष्यात तसंच राहील याची शाश्वती राहिलेली नाही. त्यात काळ प्रचंड वेगाने आपल्यावर येऊन आदळतोय. आज जे वर्तमान आहे ते उद्या तसंच राहील याची कुणालाही हमी देता येत नाही. या अनिश्चित वर्तमानाला पकडणं दिवसेंदिवस मुश्किल होत चाललं आहे. या अशा निसरड्या काळात शेवाळासारखं हाताला

काही तरी लागल्याचा भास होतो, पण हाती काहीच लागत नाही आणि भविष्याचा वेध घेताना आपली पुरती दमछाक होत राहते. वर्तमानात आपण जे लिहितो वा सांगतो ते भविष्यकाळात तगून राहील किंवा नाही याची कुणालाही या घडीला कल्पना येत नाही. या अशा अनिश्चित वर्तमानातून मार्ग काढणं एक कवी म्हणून मला दिवसेंदिवस अधिकाधिक बिकट होत चाललं आहे. मी जे जगतो, अनुभवतो, कल्पना करतो ते सगळंच्या सगळं कवितेत रूपांतरित होण्याऐवजी वाफ होऊन नष्ट होऊन जातं. आजच्या या अशा वर्तमानात एक कवी म्हणून माझ्यावर असे विकट प्रसंग वारंवार येत राहतात. तरीही खोल विहिरीच्या तळातून ओंजळभर पाणी हाती यावं तसंच कवितानिर्मितीच्या बाबतीत होत राहतं. जेवढं हाताला लागेल त्याची कविता करणं वा होणं हे सतत घडत राहतं.

**माझ्या कवितेच्या केंद्रस्थानी जशी मानवाची आदिम भुकेची जाणीव आहे, तसंच आजच्या सामान्य माणसाच्या जगण्या-मरण्याचं, प्रस्थापित व्यवस्थेकडून त्याचं माणूसपण नाकारण्याचं दुःखही आहे. त्याचबरोबर जागतिकीकरणानंतर नव्याने उदयास येणाऱ्या व्यवस्थेतील घुसमट, आपलं अस्तित्व लोप पावण्याची भीती हेही माझ्या कवितेचं मुख्य कथन आहे.**

८.

**माणूसपण टिकवून ठेवण्यासाठी कवितेचा आधार**

सध्या जगाच्या दृष्टीने कवितेचं महत्त्व फारसं नसलं तरी ती टाळता येत नाही. कविता अशी एक गोष्ट आहे, की तिच्या केंद्रस्थानी माणूस आणि त्याच्या अवतीभवतीचं अफाट विश्व यांचं निकटचे संबंध आहेत. ती नसली तरी जगाचे व्यवहार चालणे थांबणार नाही. मात्र, आजच्या रोगट समाजव्यवस्थेकरता कविता हे एक जालीम अस्त्र ठरू शकतं याचा प्रत्यय वेळोवेळी येत राहतो. एखादी जुलमी, पाशवी सत्ता उलथून टाकण्यासाठी जसा कवितेचा एक हत्यार म्हणून वापर होऊ शकतो, तसंच कवितेच्या असण्याने माणसाला जगण्याचं बळ मिळत राहतं. ती जशी माणसातलं क्रौर्य, हिंसा, द्वेष शमवण्याचं काम करत राहते, तशीच ती माणसाच्या वाट्याला अपरिहार्यपणे येणारं दुःख शमवण्याचे साधनही होऊ शकते यावर माझा ठाम विश्वास आहे. मी कविता लिहितो याचा अर्थ हाच, की माझ्यातील हिंसा, क्रौर्य, द्वेष शमवण्याचा प्रयत्न करून माणसांशी तसेच निसर्गाशी अधिकाधिक जवळ जाऊन त्यांच्याशी एकरूप होत आपलं माणूसपण टिकवून ठेवतो. खरं म्हटलं तर कविता ही माणसाला माणूसपण टिकवून इतरांच्या प्रति सहृदय होण्यास मदतच करत असते.

९.

**एका कवीची कविताविषयक जाणीव**

मराठी कवितेला आठशे वर्षांची परंपरा आहे. या परंपरेत ज्ञानेश्वर, तुकाराम यांसारखे कवी होऊन गेले. त्यांनी मराठी कवितेची परंपरा निर्माण केली. तीच परंपरा चित्रे, ढसाळ, कोलटकर यासारख्या कवींनी अधिक प्रगल्भ करून तिचा परीघ विस्तारला, तिला विश्वात्मक केलं. साठोत्तरी पिढीच्या कवीने माणसाचं प्रत्यक्ष जगणं, त्याचे प्रश्न केंद्रस्थानी आणून कविता अधिक व्यापक केली. माझ्या पिढीतील कवींनी जागतिकीकरणानंतर होणारं मूल्यांची पडझड, माणसाची घुसमट, नवनवीन व्यवस्थेमुळे होणारं माणसाचं शोषण, त्याचं वस्तूत होणारं रूपांतरण, अस्थिर काळ इत्यादींचा शोध घेत कविता अधिक सहज-सोपी करून तिचा विस्तार करण्याचा प्रयत्न केला. एवढंच नाही, तर नवनवीन प्रतिमांचा वापर, नवीन भाषा घडवत कविता जगण्याच्या केंद्रस्थानी आणून ठेवली.

मी कविता लिहिताना माझ्यावर जसा आधीच्या पिढीचा प्रभाव असतो, त्याच वेळी समकालात मराठीत तसंच अन्य भाषेत लिहिणाऱ्या कवींचाही नकळत प्रभाव पडत राहतो. या प्रभावातून माझी कविता सुटून ती माझी कविता कशी होईल याविषयी मला सतत भान ठेवावं लागतं. समकाळात लिहिणाऱ्या कवींच्या वाट्याला येणारं जग, जगण्यासाठी होणारी ससेहोलपट, भविष्याविषयीची चिंता, अस्तित्व परागंदा होण्याची भीती याविषयी जसे प्रश्न त्यांना पडतात तसेच प्रश्न कवी म्हणून मलाही सतावत राहतात. मात्र, प्रत्येक कवीची मनोभूमी, त्याचा भूतकाळ वेगवेगळा असतो. मला जरी जातिवास्तवाचे फारसे वाईट अनुभव नसले तरी माझ्या नेणिवेत ते दडून आहेत. याशिवाय जागतिकीकरणानंतर व्यवस्था वेगवेगळ्या रूपांत अवतरत असून तिचे अप्रत्यक्ष परिणाम माझ्या जगण्यावर होत राहतात. आजही माणसामाणसांतलं अंतर मिटलेलं नाही. अजूनही मूलभूत हक्कासाठी झगडावं लागतं. वर्ग असो, वर्ण वा जात, त्याचं रूपांतरण वेगवेगळ्या समूहांत होऊन खेड्यापाड्यांत, वेगवेगळ्या आस्थापनांत आजही अन्याय, अत्याचार होत राहतात. एक माणूस म्हणून जेव्हा मी या नव्या व्यवस्थेकडे पाहतो तेव्हा तिचं भीषण वास्तव चटकन लक्षात येत नाही, पण जेव्हा मी कवी म्हणून कवितेचा विचार करतो वा कविता लिहितो तेव्हा या भीषण वास्तवाचं भयानक स्वरूप समोर येतं. अजूनही

सामान्य माणसाच्या जगण्या-मरण्याचे, त्याच्या हक्काचे, भुकेचे, अस्तित्व नाकारण्याचे, अमानवी वागणुकीचे प्रश्न सुटलेले नसून त्याला माणूस म्हणून साधं जगता येत नाही हे जाणवत राहतं. हे पाहून एक कवी म्हणून मला दुःख होत राहतं आणि याच दुःखजाणिवेतून माझी कविता प्रकट होत राहते.

माझ्या पिढीमध्ये लिहिणाऱ्या इतर कवींच्या कवितेपेक्षा माझ्या कवितेचा स्वर वेगळा आहे. माझ्या कवितेच्या केंद्रस्थानी जशी मानवाची आदिम भुकेची जाणीव आहे, तसंच आजच्या सामान्य माणसाच्या जगण्या-मरण्याचं, प्रस्थापित व्यवस्थेकडून त्याचं माणूसपण नाकारण्याचं दुःखही आहे. त्याचबरोबर जागतिकीकरणानंतर नव्याने उदयास येणाऱ्या व्यवस्थेतील घुसमट, आपलं अस्तित्व लोप पावण्याची भीती हेही माझ्या कवितेचं मुख्य कथन आहे. याशिवाय सामान्य माणसाबद्दल वाटणारं कारुण्य, प्रेम, आपुलकी आणि माणसांचे एकमेकांशी तसेच निसर्गातील इतर घटकांशी असलेलं सौहार्दाचं नातं ही सिद्धार्थ जाणीवही तिच्या मुळाशी आहे. माझी कविता थेट सिद्धार्थ जाणीव ठेवून बुद्धाच्या तत्त्वज्ञानाकडे जाण्याचा प्रयत्न करीत राहते.

१०.

### कवितेचे जीवद्रव्य

माझा 'दृश्य नसलेल्या दृश्यात' हा एकमेव कवितासंग्रह पॉप्युलर प्रकाशनाने सन २०१४ मध्ये प्रकाशित केला आहे. माझ्या कविता प्रकाशित व्हाव्यात अशी तीव्र इच्छा रवींद्र किंव्हने सरांची होती; पण त्यांच्या हयातीत तो आला नाही. ज्येष्ठ कवी वसंत आवाजी डहाके सरांनी माझा कवितासंग्रह प्रसिद्ध होण्यासाठी खूप कष्ट घेतले. प्रभाताई गणोरकरांनीही सातत्याने पाठपुरावा करून तो प्रकाशित व्हावा म्हणून मदत केली. तसेच प्रा. चंद्रकांत पाटील सरांनीही माझ्या कवितेची मुद्रणं तपासून ती अधिकाधिक निर्दोष व्हावी म्हणून त्यावर संस्कार केलेत. माझा मित्र मंगेश नारायणराव काळे हा तर सतत माझ्या कवितेची पाठराखण करत लवकरात लवकर संग्रह यावा म्हणून झटत होता. या सर्वांच्याचमुळे माझा कवितासंग्रह येऊ शकला आहे. या सर्वांच्या ऋणातच मी राहू इच्छितो.

माझ्या समकालात लिहिणाऱ्या कवींच्या कवितेत जशा इंग्रजीप्रचुर प्रतिमा येतात तशा माझ्या कवितेत नाहीत. मात्र, काही प्रतिमा, प्रतीकं वारंवार येत राहतात. मिथकांचा वापरही होतो. काही कविता दृश्यात्मकही आहेत. माझं शिक्षणानिमित्त आणि पुढे नोकरीनिमित्त ठराविक काळानं स्थलांतर होत राहिलं. यामुळे मुळांपासून तुटत राहणं माझ्या वाट्याला सतत येत गेलं. ते अजूनही सुरू आहे. पाणी, भूक, घर, अतृप्त माणूस यासारख्या प्रतीकांचाही कवितेत आढळ दिसून येतो. या सगळ्यामागे जसं मुळापासून, गावापासून तुटत जाणं आहे तसंच माझा भूतकाळ, जगताना वाटचाला येणारा संघर्ष, अवहेलना हेही आहे. तसंच जातिव्यवस्थेने नाकारलेलं माणूसपणसुद्धा आहे. याशिवाय आदिमकाळापासून नाकारलेली भूक, सामाजिक प्रतिष्ठा त्याचबरोबर येणारी विषमता हीसुद्धा माझ्या नेणिवेत घट्ट दडून आहे. पाण्याला 'पानी' म्हणू नये असं जेव्हा मला सांगण्यात आलं तेव्हा मी विरोध म्हणून पाण्यावर दीर्घ कविता लिहून माझं माणूसपण हिरावून घेणाऱ्या, माझी भाषा नाकारणाऱ्या, माणूस असूनही पाण्याला स्पर्श न करता येणं याचा पाण्याच्या वेगवेगळ्या प्रतिमा-प्रतीकांतून शोध घेऊन चिरंतन दुःखाचा निरोध करण्याचा प्रयत्न केला. ते लिहीत असताना पाण्याच्या वेगवेगळ्या पातळ्या, पाण्याचा संघर्ष, त्यामुळे जाचणारे सामाजिक तसेच आर्थिक प्रश्न, पाण्याची सत्ता, तसेच शोषणाच्या विविध व्यवस्थांचा माग घेत घेत पाण्याचं सूक्त रचून महाकारुणिक प्रार्थना मांडली आणि या व्यवस्थेतील गू, घाण, चिखल वाहून नेण्यासाठी पाण्यालाच पसायदान मागितलं. दृश्य कवितांच्या माध्यमातून आपल्या अवतीभवती घडणाऱ्या घटना, सामान्य माणसाचं दुःख एक कवी म्हणून शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न करून सामान्य माणसाच्याच बाजूने मी उभा असून त्याचा कैवार घेतो आहे असं मला वाटतं.

वेगवेगळ्या काळांत वेगवेगळं रूप धारण करून वा अवतार घेऊन इथल्या बहुजनांना सत्ताहीन करणं, इतिहासातून बेदखल करणं या प्रवृत्तींचा शोध घेण्यासाठी मी मिथकांचा वापर कवितेत केलेला आहे. त्या कवितांतून सामान्य माणसाचं रुदन मी मांडलं आहे. माझ्या कवितेत येणारी 'भुके'ची प्रतिमाही याच जाणिवेत येत राहते. माझं गावातल्या गावात घर बदलणं, ठराविक काळाने होणारं स्थलांतर आणि त्यातून होणारी ससेहोलपट जशी आहे तशीच व्यवस्थेतून नाकारणं हेही 'घर' या प्रतिमेतून येत राहतं. ज्ञानेश्वरांनासुद्धा इथल्या व्यवस्थेत वाळीत टाकणं जसं आहे तसंच घर ही प्रतिमा योजून व्यवस्थेत स्थान मिळत नाही याचंही दुःख या कवितेतून मुखर केलं आहे. असं करत असताना माझ्या कवितेतील आवाज चढा होत नसून अत्यंत संयतपणे इथल्या व्यवस्थेविरुद्ध विद्रोह मी प्रकट करण्याचा प्रयत्न केला आहे. याच्या पाठीमागे केवळ आणि केवळ बुद्धाची मानवाविषयीची करुणा आहे. जगातील मानवी जीवन सुखी व्हावं. दुःखातून सुटका व्हावी याला केवळ बुद्धच उत्तर असू शकतो यावर माझा ठाम



अनुक्रमणिका

विश्वास आहे आणि याच भूमिकेतून मी माणूस म्हणून माणसांशी, निसर्गातील सगळ्या जीवसृष्टीशी सहृदयतेने वागण्याचा प्रयत्न करत माझं माणूसपण टिकवण्याचा प्रयत्न करत राहतो.

यासाठी मी सतत कवितेच्या सान्निध्यात राहणं पसंत करतो. माणसाला जसं अन्न, पाणी, घर, उजेडाची आवश्यकता असते तशीच कवितेच्या उदरभरणासाठी जीवद्रव्यांची आवश्यकता असते. कवितेला पूरक जीवनद्रव्यं मिळाली नाहीत तर ती तगणार नाही. कवी म्हणून मी सतत कवितेच्या शोधात असतो. कवितेसाठी लागणारं जीवनद्रव्य वा अन्न हे याच जीवसृष्टीत दडून आहे आणि या जीवनद्रव्याच्या शोधात मी सतत भटकत राहतो. मला वाटतं, प्रत्येक कवीसुद्धा कमीअधिक प्रमाणात अशाच प्रकारे अन्नाचा शोध घेऊन आजच्या वर्तमानात कविता जगवत असतो, तिला मरू देत नाही, ही बाब आपल्या सगळ्यांसाठी मोठी आश्वासक गोष्ट आहे.

**११.**

**एक ना एक दिवस असे सुखाचे सुरवंट...**

शेवटी आपण अशा एका स्थळी येऊन पोहोचलो आहोत, जिथे खरं तर आपल्यापैकी कुणालाही यायची इच्छा नव्हती. आकाश काळवंडून गेलं आहे आणि झाडं पिवळसर पडली आहेत. आपण सगळेच एकाकी, तणावग्रस्त, चिंतातुर अशा एका नव्याच अगम्य जगात येऊन पोहोचलो आहोत. सगळीकडे पाहावं तर कुठेही हिरवळ दिसून येत नाही. सगळं रखरखीत, कोरडं, उदासवाणं, दुःखद, नैराश्याने ग्रासलेलं जगणं पदरी पडत चाललं आहे.

असे दिवस कधी ना कधी दिवस येणारच होते. कविता हद्दपार होणारच होती आपल्या जगण्यातून. छंदोबद्ध जगणं जाऊन आपण एका हिंस्र, घनदाट मायाजालात कधी ना कधी अडकणारच होतो. हिंसा, घृणा, रक्तपात, मारामारी, रोगराई अशा जीवघेण्या धगधगीत सापडून आपण मरणाच्या खाईजवळ येऊन पडणारच होतो. प्रेम, दया, करुणा, आपुलकी यासारख्या महाकारुणिक गोष्टींऐवजी छोट्या छोट्या सुखासाठी आपण एकमेकांवर तुटून पडणारच होतो. असं एक ना एक दिवस घडणारच होतं. सुखाचे सुरवंट हळूहळू उडून जाणारच होते आपल्या जगण्यातून.

हे असं भयस्वप्न की वास्तव, की भविष्यात आपल्यापुढे येऊन उभा ठाकणारा भयावह काळोख? आणि आता तर एकयामी एकाक्ष सत्तेवर बसून आपल्या जगण्याच्या दोऱ्या आवळून घेत आहे. सुखाची स्वप्नं दाखवत हळूहळू आपल्या अस्तित्वावर घाला घालत आहे. त्यात एक कवी म्हणून आपल्या सगळ्यांना अधिक सजग राहून काळाची पावलं ओळखून सावधतेने पुढचा प्रवास सुखकारक कसा होईल हे पाहिलं पाहिजे आणि आपण मरणाच्या दारात जरी उभे असलो तरी माणसांच्या कल्याणासाठी, पृथ्वीच्या सुरक्षिततेसाठी आपण अखंडपणे कविता लिहिणं सुरूच ठेवलं पाहिजे. अजूनही समाजाला कवितेशिवाय पर्याय नाही. भविष्यासाठी, माणसाचं माणूसपण टिकवून ठेवण्यासाठी, निसर्ग शाबूत राहण्यासाठी, जेवढी पृथ्वी वाचली आहे तेवढी तरी सुरक्षित ठेवण्यासाठी येणाऱ्या काळात पुन्हा कवितेशिवाय कुठला प्रभावी पर्याय एक कवी म्हणून मला दिसून येत नाही.

**१२.**

**आणि शेवटी प्रार्थना**

कविता हद्दपार होण्याच्या या काळात कवीने अधिक जागरूक राहणं आवश्यक आहे तसंच द्रष्टेपणाने काळाची पावलं ओळखून मानवाच्या कल्याणासाठी कार्यरत असावं लागणार आहे. पृथ्वीवर जोपर्यंत मानवी जीवन आहे तोपर्यंत नाउमेद होण्याची गरज नाही. जोपर्यंत भाषा आहे, शब्द आहेत आणि कवी आहे तोपर्यंत कविता तग धरून राहणार आहे या पृथ्वीवर. यासाठी आपण आशावादी असायला हरकत नाही.

*काहीच नाही तरी काही तरी उरेलच*
*शेवटी या पृथ्वीवर*
*नाही म्हणजे एखादे झाड तग धरून*
*असेलच सावलीसकट*
*एखादा सहज माणूस असेलच*
*स्वप्न पाहत पृथ्वीचे*
*शब्द असतीलच कुठे तरी जमिनीवर विखरून*
*श्वास असतीलच कुठे तरी अडकून हवेत*

*काहीच नाही तरी एखादा कवी असेलच*
*कुठे तरी माती मुठीत घेऊन*
*जो पुन्हा निर्माण करेल*
*एखादी नवी सृष्टी पृथ्वीवर*
*जो वाहत राहील भार*
*पुन्हा काळोखाचा उजेड येईस्तोवर*

आणि जोपर्यंत पृथ्वीवर कवी आहे तोपर्यंत आपण सुरक्षित असणार आहोत. शेवटी विश्वास ठेवायला काय हरकत आहे, की आपण जिवंत आहोत आणि अजूनही फुलांना वास येतो आहे.

◆

**दिनकर मनवर**
भ्रमणध्वनी : ८१०८६८३९१९
dinkarmanwar@gmail.com



अनुक्रमणिका







# दिनकर मनवरांची कविता : एका सहज माणसाच्या मनात दडून असलेली उदासी



दिनकर मनवर यांचा आतापर्यंत 'दृश्य नसलेल्या दृश्यात' हा एकमेव कवितासंग्रह प्रकाशित झाला आहे. पॉप्युलर प्रकाशनाने तो प्रकाशित केला आहे. हा संग्रह वाचणे आणि त्यातील अनुभूती मनात उतरणे ही एक प्रक्रिया आहे, जी सोपी नाही. कारण 'अपूर्ण वर्तमानाचं संपता न संपणारं दृश्य आणि परंपरागत दुःखाचं दृश्य' या दोन्ही दृश्यांची विलक्षण सरमिसळ त्यांच्या नेणिवेत अखंड सुरू आहे आणि ती व्यक्त करण्याचा कटीण प्रयास ते करीत आहेत. खरे तर आहे त्या वर्तमानाचे दृश्य पाहणेच मुळात कोणत्याही संवेदनक्षम माणसासाठी सोपे नाही. त्यात भूतकाळाची दृश्ये सतत मनात हेलकावत राहतात, डोळे मिटले तरी दिसत राहतात. 'दृश्य' ही संज्ञा व्यापक, विस्तारत जाणारा अर्थ व्यक्त करते. दृश्ये असंख्य असतात. त्यांना परिमाणे असतात. त्यांच्यामागे अनेक आठवणी उभ्या राहू शकतात. कधीही प्रत्यक्ष न पाहिलेले दृश्य मनात उभे राहू शकते. उदा.

'कालोघात अदृश्य झालेल्या एका पुरातन दृश्यात
एक राजपुत्र पाहतोय एका मृत माणसाचा देह
तो पाहतोय एक माणूस रोगानं व्याधिग्रस्त झालेला...
...जराजर्जर झालेला...'

हे न पाहिलेले पण कल्पिलेले दृश्य आहे, 'ही हिरवळ, ही हिरवी गर्द पानांची सळसळ... ही पाण्यानं तुडुंब भरलेली जागोजागची तळी...' हे पाहिलेले दृश्य आहे आणि 'उजाड झालेलं रानं, भणंग झालेली शेतं' - हे एका माणसाच्या मनात दडून राहिलेल्या उदासीतून उगवून आलेले दृश्य आहे. दिनकर मनवर यांच्या कवितेचे वैशिष्ट्य हे, की आतपर्यंत विस्तारत जाणाऱ्या अनेक वर्तुळांच्या, अनेक परिमाणांच्या चित्रासारखी ती पसरत जाते. 'दृश्य' या एका शब्दाच्या साहाय्याने ते हा परिणाम साधत जातात. त्यांच्या संग्रहातल्या सुरुवातीच्या दहा कविता या जशा दृश्याच्या, दृश्यातल्या दृश्यांच्या आहेत, पण त्यांचा आपल्या मनावरचा परिणाम असा होतो, की पुढच्या कवितांमधूनही आपल्याला दृश्ये दिसतात, भासत राहतात.

मनवर यांच्या पाण्याविषयीच्या कविता मराठी कवितेच्या दृश्यात अभूतपूर्व ठराव्या अशा आहेत. वंचितांच्या हजारो वर्षांच्या वेदना या कवितांमधून झरताहेत.

'पाणी हा शब्द
मला कसाही उच्चारण्याची मुभा नाहीये...
...पाणी कसं अस्तं आकाशासारखं निळंशार
किंवा अंगठा छाटलेल्या उडालेल्या
रक्ताच्या चिळकांडीसारखं लालसर.
पाणी कसं अस्तं - स्वच्छ, पातळ की निर्मळ?
... (पाणी कसं अस्तं हे मला अजूनही कळू दिलेलं नाहीये.)
...जे तुंबवून टेवलेलं अस्तं तळ्यात ते पाणी अस्तं?
पोहऱ्यानं पाणी उपसून घेतलं तर विहिरीतलं पाणी विटतं?
... पाणी स्पृश्य असतं की अस्पृश्य?
आणि पाणी वरचं-खालचं झालं केव्हापास्नं
की कुणाच्या हात लावण्यानं ते कसं काय बाटतं?..

किंवा, 'विशेषणं' या कवितेत.

'निळं, काळं, सावळं, लालभडक, हिरवट, पांढरंशुभ्र
झुळझुळ, खळखळ... गढूळ, सडकं, दुर्गंध... कडू-गोड, थंड-गरम
...यासारखी विशेषणं
पाण्याला कुणीही लावू शकतात...
पण बाटलं हे असं एकच विशेषण आहे की
ज्याचा निव्वळ हात लागला पाण्याला



अनुक्रमणिका






तरी आपसूकच वाटलं जातं पाणी... '

मनवरांच्या या पाण्याविषयीच्या कविता दलित कविता नाहीत, तर कक्षेच्या बाहेर पडून पाण्याचे आणि माणसाचे आर्ष, आदिम नाते तऱ्हेतऱ्हेने व्यक्त करणाऱ्या आहेत. पाण्याविषयीची 'व्याकरण' ही कविता मुळातून वाचली पाहिजे.

'पाण्याच्या पुढं कुणी दिला कितीही पूर्णविराम
तरी थांबत नाही पाण्याचा प्रवाह...
पाण्याला प्रश्नचिन्ह लावूनही
कुणी शंका घेऊ शकत नाही
पाण्याच्या अंतःकरणाविषयी...
...पाण्याला कितीही समानार्थी शब्द वापरले तरी
त्याची जात कोणती
हे ठरवता आलेलं नाही अद्याप भाषेलाही...'

किंवा,
'कुठल्याही सार्वजनिक नळाची तोटी उघडून
बिनदिक्कतपणे घोटभर पाणी प्यावं
आणि तहानलेल्यांनी तृष्णा भागवावी
हे दिवस खरं तर आता इतिहासजमा झालेयत...
...नि झाडांना मडकं लटकवून पाखरांना पाणी पाजणं
अंगणातल्या सुकत चाललेल्या कडुनिंबाला पाणी घालणं
असलं शहाणपण करण्यास कुणीच कनवाळू धजणार नाही-'

या ओळी व्यापक मानवतेकडे निर्देश करतात, ती नष्ट होत जाणाऱ्या काळासंबंधी सांगतात. सर्वच गोष्टींचे व्यापारीकरण करण्याच्या काळाचे वर्तमान त्यांना सांगायचे आहे.

या काळाबद्दल मनवर सतत विचार करीत आहेत, आणि त्यांच्या मनातले विचार त्यांना कोणालाही ओरडून, मोठ्या आवाजात सांगायचे नाहीत. आतल्या आत अखंड विचार करणे हाच त्यांचा स्वभाव आहे. 'दृश्य नसलेली दृश्ये' ते पाहत आहेत आणि 'दृश्य दृश्यात' त्यांना ज्या ज्या गोष्टी, जी जी दृश्ये दिसताहेत त्यासंबंधी ते विचार करीत आहेत. त्यांचे त्याबद्दलचे बोलणेही आतल्या आतच सुरू आहे. कवितेचा हा 'आतला स्वर' एकूण मराठी कवितेत फारसा ऐकू आलेला नाही. मराठी कवितेचा एकूण उच्चरवात, श्रोत्यांना उद्देशून बोलण्याची सवय आहे.

**दिनकर मनवरांची कविता अगदी खालच्या स्वरात माणसाचे आदिम दुःख, माणसांचे माणसांपासून तुटण्याचे दुःख, आजच्या काळात या एकटेपणाला आलेले क्रूर आणि जगड्व्याळ स्वरूप आणि त्यातून येणारी खिन्न उदासी व्यक्त करते. आजच्या भवतीच्या कवितेत ती वैशिष्ट्यपूर्ण, लक्षणीय आणि महत्त्वाची ठरते ती त्यामुळे.**

पाण्यासंबंधीच्या 'सूक्त', 'धर्म', सार्वजनिक थोडंच राहिलं आहे', 'थेंबभर पाण्यासाठी', 'सत्ता', 'जे पाणी वाहत होतं', 'उच्चार', 'साक्षात', 'अस्तित्व' अशा कविता पाण्यासंबंधीच्या नाहीत; त्या विषम व्यवस्थेविषयीच्या आहेत, शोषणाविषयीच्या आहेत, व्यापारी वृत्तीविषयीच्या आहेत, विद्रोहाविषयीच्या आहेत.

'डोक्यावर मुबलक सांडणारं सूर्याचं कोवळं ऊन...
किंवा पायाखाली केव्हाही आधार देणारी कसदार माती
यापैकी काहीही सहज मिळू दिलेलं नाहीये आम्हाला
म्हणून तर पंचगंगेच्या काठावर पाण्यानंच विद्रोह केला होता...
किंवा घोटभर पाणी चाखल्यानं पेटून उठलं होतं
मुक्तीसाठी चवदार तळ्यातलं निःशब्द पाणी...'

तथापि, येथे चवदार तळ्याचा उल्लेख असला, तरी
'म्हणजे पाण्यासारखी गोष्टसुद्धा
मोफत मिळू द्यायची नाही म्हणून
कोणी अधिनियमात दुरुस्ती सुचवत आहे की काय?'

त्यामुळेच आतल्या आत सुरू असलेले बोलणे, वर्तमानासंबंधीचे हे चिंतन, वर्तमानकाळावरचे हे भाष्य सूक्ष्म, गर्भित असते. 'उद्याच्या दिवसाची खिडकी' ही चिंतनपर कविता याचे उत्तम उदाहरण आहे.

'...काळच्यासारखेच कुणी भितरा, घावरट, कुवड आलेला, ओझ्याने वाकलेला, दुःखाने पिसलेला किंवा गलितगात्र वगैरे आढळून आला की काळच्यासारखीच त्याची रवानगी कत्तलखान्याकडे करतील कुणी, काळच्या आधीच्या काळच्यासारखे दुसऱ्याच्या खिशात हात घालून त्यांच्याकडे शिल्लक उरलेला आनंद घेतील दोन्ही हातांनी, घेतील ओरवाडून आणि वाटून घेतील आपसात गुपचूप...'

मनवरांनी अगदी 'रिस्क' घेऊन कवितेच्या संकेताबाहेर

जाणारी ही कविता मनात आलेल्या गद्यसदृश विचारांसारखी एकापाठोपाठ एक येणाऱ्या वाक्यांसारखी ठेवली आहे. ती शांतपणे, तिचा ओळीओळींमध्ये दडून असलेले - 'बिट्वीन द लाइन्स' भाष्य, सूक्ष्म अर्थ समजून घेत जावी लागते. मुख्य म्हणजे उपहास, उपरोध, तिरकसपणा, स्वतःला वर ठेवण्याचा आव ह्यातले काहीही या आवाजात नाही.

'एखाद्याला जरी चुकून रणरणत्या उन्हात हिरवंगर्द झाड दिसलं की घेतील उपटून मुळांसकट आणि खोचतील डोक्यात जो तो आपल्याला वाटेत येणारे रस्ते घेईल गुंडाळून आणि गरज भासेल तेव्हा त्याची घडी उकलून पसरील स्वतःसाठी...' या कवितेत एकही अर्धविराम, स्वल्पविराम, पूर्णविराम नाही, अविरत मनात येणाऱ्या विचारांना जसे नसतात तसे.

कवीच्या मनात सुरू असलेले विचार समाजसंबद्धच केवळ आहेत असे नव्हे. जगण्यात प्रत्यही अनुभवाला येणाऱ्या विपरीततेचा, असंबद्धतेचाही विचार अगदी साध्याशा प्रसंगातूनही येतो. हा प्रसंग आपणही अनुभवलेला असतो, पण असा विचार मात्र करीत नसतो.

'बसस्थानकात बस येऊन उभी राहिली की
खिडकीतल्या प्रवाशाला खालून कुणी तरी विचारतोच एखादा,
की बस कुठं चाललीय म्हणून...'

किंवा,

'गच्च कोंबून प्रवासी वाहून नेणाऱ्या बसमधील
उभ्या असणाऱ्या प्रवाशाला खरं तर
लगतच्या सीटवर बसून प्रवास करणाऱ्या प्रवाशाबद्दल
असूया वाटत असते नेहमीच...'

अशीच असूया बाजूला बसणाऱ्याच्या मनात खिडकीजवळ बसणाऱ्याबद्दल, किंवा बसमध्ये अगदी शेवटी कसा बसा एका पायावर उभा राहणाऱ्याला बसमध्ये बसून प्रवास करणाऱ्याबद्दल, जे ताटकळत उभे असतात, बसची वाट पाहत असतात त्यांना गच्च भरून आलेल्या बसबद्दलच असूया वाटत असते!

'म्हणजे असूया ही खालून वर, शेवटातून समोरच्याकडे
किंवा जवळून नजीकच्या नजीक आपल्याही नकळत पसरत जाते निरंतर.'

माणसांचे इतरांशी असणारे वर्तन हा त्यांच्या विचाराचा सर्व कवितांतून फिरणारा एक असा धागा आहे, जो या कवितेला वेगळ्या विणीची बनवतो.

'प्रत्येक पडण्यातून आपण सावरत नाही तोवर
लगेचच कुणी तरी ढकलून पाडतोच आपल्याला
रस्त्याच्या मधोमध, आणि सांडून जातं सगळं सुख खिशामधून...'

हा 'कुणी तरी' कोण आहे? कवीला कधी कधी 'अदृश्य सत्ता' हेही उत्तर सुचते. कधी कधी सारंच अजत्र असते. तर्कशुद्ध पण तर्कहीन. ॲब्सर्ड.

'फुलपाखराचं चित्र काढलं रंगीबेरंगी
अवतीभोवती त्याच्या फुलझाडं काढली नाहीत
फुलपाखराचा जीव उबगला नि गेले उडून...'

मनवरांची विचार करण्याची तऱ्हा विलक्षण आहे. 'चित्र' कविता मुळातूनच पाहावी.

ही कविता रंजक नाही, विक्षिप्त नाही. या संग्रहात एकही निसर्गकविता नाही, एकही प्रेमकविता नाही. या संग्रहातल्या कविता भावकविता नाहीत, स्फुट कविता नाहीत. स्वभावतःच ही कविता चिंतनशील आहे. एकातून दुसरा, दुसऱ्यातून पुढचा, अशी विचारांची साखळी, असे तिचे स्वरूप आहे. त्यामुळे कधी कधी कवितेचा घाट न स्वीकारता गद्यसदृश परिच्छेद, असा घाट घेणे तिला भाग पडते. चिंतनशीलता हा या कवितेचा धर्म आहे. या चिंतनाचे अनेक पैलू आहेत, पण मुळात मानवी अस्तित्व हे त्याचे केंद्र आहे. 'भुकेला दिला असता पर्याय तर', 'भूक चिरंतन आहे या पृथ्वीवर', 'मी उघडणार नाही ताटी या घराची', 'कदाचित माझा संबंधही उरला नसेल भाषेशी', 'दिसामाजी किती बोलल्या जातंय' या चिंतनपर दीर्घ कवितांमधून जो 'मी' आहे तो प्रातिनिधिक आहे. महर्षी व्यास आणि पार्वतीपुत्र गजानन यांनी बृहद्‌महाकाव्यात ज्याच्याबद्दल अवाक्षरही लिहिलं नाही.

'तुम्ही मला केव्हाच घेतलं नाही उतरंडीत तुमच्या
...मी रेड्याच्या तोंडून वेद वदवले
मी चालवून दाखविली निर्जीव भिंत,
तरीही तुमचे द्रवले नाही काळीज-' तो.

किंवा,

'भाषा नव्हती तेव्हाही मी होतोच
भाषा आहे तेव्हाही मी आहेच.' हा 'तो' प्रातिनिधिक आहे.

जो नाकारला गेला आहे, ज्याला विराट भूक लागली आहे, 'थोडासा उजेड मागितला तरी भस्मसात केलं जातंय माझं खांडववन पुन्हा पुन्हा...' तो हा या कवितांमधून प्रभावीपणे उभा राहतो... कोणत्याही उग्र, आक्रस्ताळी भाषेचा आधार न घेता.

◆

प्रभा गणोरकर
भ्रमणध्वनी : ९५४५४६१७३७



सुमनांजली

ज्येष्ठ साहित्यिक विलास सारंग यांचं अलीकडेच निधन झालं. कविता, कथा, कादंबरी, समीक्षा असे विविध साहित्यप्रकार हाताळत त्यांनी मोजकीच पण अस्सल साहित्यनिर्मिती केली. मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेत त्यांनी लेखन केलं. या सर्जनशील साहित्यिकाच्या साहित्यकर्तृत्वाचा धांडोळा घेणारा लेख.

■

प्रशान्त बागड

■

# बंडवाला लेखक विलास सारंग

विलास सारंग १४ एप्रिल २०१५ रोजी हे जग सोडून गेले. सारंग हे १९५० नंतरच्या कालखंडातील अव्वल अॅव्हाँ-गार्ड भारतीय लेखकांच्या मांदियाळीतले कुशाग्र प्रतिभेचे एक लेखक होते. मराठी व इंग्रजी या दोन भाषांत त्यांनी अपारंपरिक धाटणीच्या पण परंपरेला नवीन वळण देऊ शकणाऱ्या कथा, कादंबऱ्या, कविता, नाटकं, अनुवाद व समीक्षा लिहिली.

'अॅव्हाँ-गार्ड' या फ्रेंच शब्दाच्या वाङ्मयीन अर्थच्छटेकडे एक कटाक्ष टाकूयात. मुळात हा शब्द मध्ययुगातील सैन्यविषयक परिभाषेतला आहे. एखाद्या प्रदेशाची चाचपणीवजा टेहळणी करण्यासाठी पुढे जाणाऱ्या निवडक जवानांच्या दलाला वा तुकडीला 'अॅव्हाँ-गार्ड'- 'अॅडव्हान्स गार्ड' - असं म्हणतात. मुख्य सैन्य मागे राहतं. ते सावध आणि सतर्क असतंच; पण हे अग्रेसर दल जोखीम पत्करून पुढे सरसावतं आणि शत्रूचा हिकमतीने माग काढू पाहतं. कला व साहित्य या क्षेत्रांमधील मुख्य प्रवाहापासून जरा दूर जाऊन, कधी कधी मुख्य प्रवाहाशी फटकून वागून, ठराविक साचे टाळून, ठेवणीतल्या चीजांवरही विसंबून न राहून; वेगळ्या, असांकेतिक, अज्ञातवेधी कलाकृती वा साहित्यकृती निर्माण करू पाहणाऱ्या बिनीच्या कलावंतांना व लेखकांना अॅव्हाँ-गार्ड म्हटलं जातं. म्हणजेच सैन्याच्या परिभाषेतल्या या शब्दाला वाङ्मयक्षेत्रात एक नवीन पैलू लाभतो. आगळं वेगळं शोधू-म्हणू पाहणाऱ्या अॅव्हाँ-गार्ड लेखकाला प्रस्थापित शोधांची व विधानांची चिकित्सा करावी लागते; प्रसंगी सबंध परंपराच खिळखिळी झाली पाहिजे, असा आग्रहही धरावा लागतो. या अर्थी अॅव्हाँ-गार्ड लिखाण























हे एक प्रकारचं बंडच असतं. त्यामुळे 'ॲव्हाँ-गार्ड'ला कवी बी यांनी ज्ञानेश्वरांच्या बाबतीत वापरलेला 'बंडवाले' हा एक चांगला मराठी पर्याय होऊ शकतो. विलास सारंग हे असे ॲव्हाँ-गार्ड व बंडवाले लेखक होते.

१४ एप्रिल म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची जयंती. सारंग त्या दिवशी गेले. हा निव्वळ योगायोग असेल; पण योगायोगांचे अर्थ लावण्याची जबाबदारी मागे राहिलेल्या मर्त्यांवर येऊन पडतेच. 'दलितांचे पुढारी' व 'राज्यघटनेच्या मसुदा समितीचे अध्यक्ष' या कोंदणांमधे-म्हणजेच कडीकुलपांमधे- डॉ. आंबेडकरांचं कार्य कोंवता येणार नाही याची जाणीव आजही करून द्यावी लागते. गांधी, नेहरू वा टागोर हे जसे स्वातंत्र्य आंदोलनाचे वा देशाच्या पुनरुत्थान प्रक्रियेचे धुरीण होते, तसेच डॉ. आंबेडकरही स्वतःची जीवनदृष्टी व व्यापक अर्थाची धर्मदृष्टी असलेले त्याच तोलामोलाचे प्रमुख नेते होते, हे आजही बिनदिक्कतपणे मान्य होताना दिसत नाही. या अर्थाने डॉ. आंबेडकरांची आजही उपेक्षाच होत आहे. सारंगांची स्थिती याहून वेगळी नाही. काफ्का वगैरे पाश्चात्त्य लेखकांना अनुसरणारा लेखक, अशा वर्णनांनी त्यांच्या कार्याची बोळवण केली जाते. त्यांच्या निधनाची वार्ता कशीबशी देताना एका मराठी वर्तमानपत्राने त्यांच्या एका कवितासंग्रहाचं शीर्षक चुकीचंच छापलं होतं. 'कविता १९६९-१९८४' असं त्या संग्रहाचं शीर्षक आहे, परंतु वर्तमानपत्रवाल्यांनी ते 'मराठी कविता १९६९-१९८४' असं छापलं होतं. कित्येक इंग्रजी वर्तमानपत्रांनी तर सारंगांच्या निधनाची बातमीदेखील दिली नाही. सारंग ॲव्हाँ-गार्ड व बंडवाले लेखक असतीलही, वाङ्मयीन परंपरेवर कालोचित संस्कार करण्याचं सामर्थ्य त्यांच्या लिखाणात असेलही, पण साहित्य अकादमीच्या वार्षिक पुरस्कारासारखा एकही प्रतिष्ठेचा पुरस्कार न मिळताच सारंग कालवश झाले. पुढे गेलेल्या म्होरक्याला मागच्यांच्या अनास्थेमुळे पुढच्याच शांत टापूतून निघून जावं लागलं ही वस्तुस्थिती चटका लावणारी आहे.

अलिप्त व चिंतनशील वृत्तीचा हा लेखक गेल्या काही वर्षांत आजारपणामुळे अधिकच एकांडा व उदास झाला होता. गेल्या दोन-तीन वर्षांत सारंगांनी नेमकं काय लिहिलं हे त्यांच्या जवळच्या स्नेह्यांनाही माहीत नाही असं दिसतं. त्यांच्या अंत्यविधीस साहित्यविश्वातले मोजकेच लोक हजर होते. अरविंद अडिगा यांनी दोन वर्षांपूर्वी 'आऊटलुक'-मधील आपल्या लेखात सारंगांना विस्मृतीत ढकलण्याच्या कृतीविषयीची खंत व्यक्त केली होती. म्हटलं तर हे सारं शोकात्म आहे, पण एका अर्थी हे सारं अन्वर्थक देखील आहे. १९७५ साली प्रसिद्ध झालेल्या आपल्या पहिल्या कथासंग्रहाचं शीर्षक म्हणून सारंगांनी 'सोलेदाद' या स्पॅनिश शब्दाची निवड केली होती. 'सोलेदाद' म्हणजे एकान्त. सारंगांचा 'सोलेदाद' किर्केगार्दच्या 'ती व्यक्ती' ('दॅट इंडिव्हिज्युअल') या शब्दांची आठवण करून देतो. आपल्या थडग्यावर केवळ 'ती व्यक्ती' एवढेच शब्द कोरावेत अशी इच्छा किर्केगार्दने कैकदा व्यक्त केली होती. सारंगांच्या निधनाकडे झालेलं अलक्ष किंवा दुर्लक्ष पाहता सारंगांनीही 'सोलेदाद' हा शब्द आपला 'एपिटाफ' म्हणून, आपल्या पश्चात आपलं वर्णन करणारा शब्द म्हणून निवडून व जपून ठेवला होता असं म्हणता येईल.

सारंगांनी विचित्र वाटतील अशा कविता लिहिल्या. उदाहरणार्थ, 'सापडलेल्या' कवितांशी मराठीचा परिचय

करून देण्याचं श्रेय त्यांना द्यावं लागेल. सारंगांनी शोधक नाटकं लिहिली. उदाहरणार्थ, 'पपई पिकल्या का?' हे त्यांचं नाटक कौटुंबिकता माणसाच्या आदिमपणाचा कसा ऱ्हास करते याचा अनुभव देतं. सारंगांनी उत्तम समीक्षाही लिहिली. विचक्षण बुद्धीने केलेलं सूक्ष्म वाचन हा त्या समीक्षेचा मूलाधार होता. परंतु सारंगांच्या प्रतिभेचा अर्क प्रकट झाला तो त्यांच्या कथात्म लेखनात. कारण ते मुळात कथाकार होते, फिक्शन-निर्मिक होते. 'द विमेन इन केजीस' या इंग्रजी कथासंग्रहाच्या परिशिष्टात सारंगांनी 'फिक्शन आर्टिस्ट' असा चपखल वाक्प्रयोग केला आहे. 'सोलेदाद', 'आतंक' (१९९९) आणि 'चिरंतनाचा गंध' (२००९) या तीन कथासंग्रहांना 'प्रयोगशील' व 'अस्तित्ववादी' ही विशेषणं डकवली जातात. अशी चलनी विशेषणं व आयती लेबलं वापरणं सोपं असतं; परंतु त्यामुळे लेबलविशेषणांच्या जाळ्यात न अडकणारी, सर्वसामान्य वर्णनांना खोटं पाडणारी वैशिष्ट्यपूर्णता नजरेआड होण्याचा धोका उद्भवतो. कथात्म लेखन ही एक साहसपूर्ण सफर असते, कथात्म लेखन हे ज्ञानविज्ञानाला अप्राप्य असलेल्या व त्यांच्या भाषेत अनुवादित वा रुपांतरित न करता येण्यासारख्या सत्याचं शोधन असतं, ही जाणीव रूजवण्याचा सारंगांनी भगीरथ प्रयत्न केला.

सारंगांच्या कथा-कादंबऱ्यांची भाषा ही 'निष्पर्ण', थंड, कोरडी व मितुल आहे. संस्कृतप्रभारित वर्णनांचं व अलंकारांचं प्राचुर्य आणि रसनिष्पत्तीचा सोस यांचं अधिराज्य असणाऱ्या काळात सारंग अशा तऱ्हेचं विरक्त गद्य लिहीत होते. दिवाळी अंकांत जास्तीत जास्त कथा याव्यात म्हणून कथालेखक परस्परांशी चढाओढ केल्यागत कथा हातावेगळ्या करत असत, तेव्हा सारंग आपल्या हस्तलिखितातल्या रचनांना वारंवार अग्निदिव्याला सामोरं जायला लावत. असं तावून-सुलाखून बाहेर पडणारं सारंगांचं लिखाण रेखीव व स्वयंसर्जक असायचं.

सारंगांना उच्चवर्णीय, मध्यमवर्गीय, ताठ शुद्धाशुद्धविवेक बाळगणाऱ्या ब्राह्मणवादी वातावरणाशीही झगडावं लागलं. या संवेदनवृत्तीला केवळ करमणूक करणारं, प्रश्न विचारून हैराण न करणारं निव्वळ 'कलात्मक' साहित्य हवं होतं. सारंगांना या 'जैसे थे' वादाशी कडवा सामना करावा लागला. त्याचबरोबर 'माती' आणि 'मुळं' या वस्तूंविषयी ममता व्यक्त करण्याचे सर्वाधिकार आमचेच आहेत, असा दावा करणाऱ्या अकल्पक व जडशीळ वास्तववादाशीही सारंगांची गाठ पडत गेली. सारंगांचं समीक्षालेखन या दोन्ही प्रकारच्या अभिरुचिविषयक विचारव्यूहांच्या सुप्त व प्रकट अवतारांचा पद्धतशीर परामर्श घेतं. त्याचबरोबर, हरिश्चंद्र थोरात यांनी म्हटल्याप्रमाणे सारंगांनी आपली समीक्षा अभिव्यक्तीचे आणि जगण्याचे नवनवीन आकार शोधण्यासाठीदेखील वापरली.

१९४२ हे सारंगांचं जन्मवर्ष. 'चले जाव' आंदोलनाच्या काळात जन्मलेला हा लेखक वेढा व मुक्ती, पराधीनता व स्वाधीनता यांच्या संधिकालात वावरत होता. इंडियाना युनिव्हर्सिटी ब्लुमिंग्टन इथून तौलनिक साहित्यावरील दुसरी पीएचडी पदवी संपादन केल्यावर सारंग गेले ते थेट इराकमधील बसरा नावाच्या शहरात. तिथल्या विद्यापीठात ते इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले व पाचेक वर्ष त्या मुलखात राहिले. आपल्या 'एन्कीच्या राज्यात' (१९८३) या कादंबरीतील नायकाप्रमाणे सारंगांनी हा प्रवाहाच्या उलट दिशेला पोहण्याचा निर्णय घेतलेला दिसतो. सारंगांचा नायक - आणि कदाचित सारंगही - मानवी संस्कृतीच्या पाळण्यात राहून संस्कृतीच्या उगमाचा, मुळांचा, मूलघटकांचा शोध घेण्याची मनीषा बाळगतात. पूर्वनिर्धारित नियती आणि मानवी अस्तित्वाची परांची (स्कॅफॉल्डिंग) या इतिहासाच्या दोन रूपांचं द्वंद्वविकासी नाट्य अनुभवतात. या कादंबरीने मराठी कादंबरीला आपली जीर्ण कात टाकून देण्यासाठीचं निमित्त पुरवलं होतं. कादंबरी हे केवळ युगभान व्यक्त करण्यासाठीचं माध्यम नसून अस्तित्वात असणं म्हणजे काय, इतरेजनांशी संबंध जोडणं म्हणजे काय, स्वतःच्या 'स्व'ची निर्मिती वा अनुभूती म्हणजे काय, जगणं व मरणं म्हणजे काय, या प्रश्नांचा खल करणारी कृती, अशी शक्यता या कादंबरीने मूर्त करून दाखवली होती. सारंगांच्या कथांप्रमाणेच 'एन्कीच्या राज्यात'मधेही गणिती नीटनेटकेपणा व काव्यात्म सघनता या गुणांचा प्रकर्ष आढळतो. सारंगांनी स्वतःच या 'राजकीय' कादंबरीचं इंग्रजी भाषांतर केलं आहे ('इन द लँड ऑफ एन्की', १९९३).

सारंग स्वतःला द्वैभाषिक लेखक म्हणवून घेत. ते आपल्या मराठी कथांचं इंग्रजीत भाषांतर न करता इंग्रजीकरण करत असत. सारंगांच्या कथांचे असे इंग्रजी अवतार अनेक नामवंत अमेरिकन, ब्रिटिश व युरोपीय वाङ्मयीन पत्रिकांमधून प्रकाशित झाले आहेत. या कथांचा संग्रह 'फेअर ट्री ऑफ द व्हॉइड' या नावाने पेंग्विनने १९९० साली प्रकाशित केला. या पुस्तकाला लहानसा पण हुशार वाचकवर्ग लाभला. शिवाय या पुस्तकाने समीक्षकांचेही लक्ष वेधून घेतलं. 'द विमेन इन केजीस : कलेक्टेड स्टोरीज' (२००६) या पेंग्विननेच काढलेल्या संग्रहात 'फेअर ट्री'मधील कथा तर आहेतच, पण अजून काही नव्या कथांचाही समावेश आहे. यापैकी काही कथा सारंगांनी इंग्रजीतच लिहिलेल्या होत्या व नंतर त्यांचं मराठीकरण केलं गेलं. माझ्या सुदैवाने या मराठीकरणाच्या प्रक्रियेत सारंगांनी मला सहभागी करून घेतलं होतं. या मराठीकरण केलेल्या कथा 'चिरंतनाचा गंध' या संग्रहात आहेत. कथेची मराठी वा इंग्रजी संहिता म्हणजे





अनुक्रमणिका

कथेचं केवळ एकरूप, एकआविष्कार असतो अशी सारंगांची धारणा होती. यापैकी एकाच रूपाला वा आविष्काराला मूळ, अस्सल वा अधिकृत संहिता मानणं गैर ठरेल. प्रत्येक रूप वा आविष्कार हा पकडीतून सतत निसटणाऱ्या, 'प्लेटॉनिक फॉर्म'सारख्या खरोखर खऱ्या अशा अमूर्त कथेचा निर्देश करत असतो, असं सारंगांच्या भूमिकेचं वर्णन करता येईल. म्हणजेच सारंगांचं द्वैभाषिकत्व ही मराठी व इंग्रजी आणि नेणीव व जाणीव यांच्यातील आंतरक्रियात्मक क्रीडा होती. 'द्वैभाषिक लेखकाची कैफियत' या व्याख्यानात त्यांनी या आशयाचं म्हणणं मांडलेलं आहे. कथेचं इंग्रजी रूप हे अधिक पक्कं वा स्पष्ट आहे, असं सारंग काही वेळा म्हणत असत. आपलं लेखन ही पूर्णतः जाणिवेच्या पातळीवरची सुनियंत्रित अशी कृती असली पाहिजे, हा सारंगांचा आग्रह या प्रतिपादनातून डोकावतो. आपलं लेखन या अर्थाने विवेकशील असावं, ही सारंगांची प्रगाढ लेखक महत्त्वाकांक्षा होती.



**सारंगांच्या कथा-कादंबऱ्यांची भाषा ही 'निष्पर्ण', थंड, कोरडी व मितुल आहे. संस्कृतप्रभारित वर्णनांचं व अलंकारांचं प्राचुर्य आणि रसनिष्पत्तीचा सोस यांचं अधिराज्य असणाऱ्या काळात सारंग अशा तऱ्हेचं विरक्त गद्य लिहीत होते. दिवाळी अंकांत जास्तीत जास्त कथा याव्यात म्हणून कथालेखक परस्परांशी चढाओढ केल्यागत कथा हातावेगळ्या करत असत, तेव्हा सारंग आपल्या हस्तलिखिततल्या रचनांना वारंवार अग्निदिव्याला सामोरं जायला लावत. असं तावून-सुलाखून बाहेर पडणारं सारंगांचं लिखाण रेखीव व स्वयंसर्जक असायचं.**

'सिसिफस आणि बेलाक्वा' (१९८२) ही सारंगांची पुस्तिका स्पष्ट स्वरात नवोदित मराठी आधुनिकवादाचा वारसा- काफ्का, कामू, बेकेट- जाहीर करते. 'मराठी नवकादंबरी' या निबंधात त्यांनी भालचंद्र नेमाडे यांची 'कोसला', कमल देसाईंची 'काळा सूर्य आणि हॅट घालणारी बाई' आणि किरण नगरकरांची 'सात सक्कं त्रेचाळीस' या गाजलेल्या कादंबऱ्यांची काटेकोर तपासणी केली आहे. 'सात सक्कं' ही नवतेचा बुरखा पांघरलेली पण ना. सी. फडके परंपरेत शोभून दिसेल अशी प्रेमकहाणीच आहे, असा सारंगांचा मूल्यनिर्णय आहे. नगरकरांचा निवेदक अनेक ठिकाणी 'डिफेन्सिव्ह आयरनी'चा आश्रय घेऊन आपला नवतेचा आव उघडा पडल्याची नकळत कबुली देतो, हे सारंगांचं निरीक्षण मार्मिक आहे. शिवाय या निवेदकाचा तुच्छतावाद सोयीस्कर असून हव्या त्या स्थळी-काळी तो भिरकावून सर्वसामान्य सुखांत रत होण्याचा निवेदक-नायकाचा सोसही सारंग सोदाहरण निदर्शनास आणून देतात. ही करडी टीका सारंगांच्या मर्मज्ञतेची ग्वाही तर देतेच, पण १९६० व ७० च्या दशकांतील मराठी वाङ्मयविश्वातील चैतन्यपूर्ण चळवळशीलतेचीही आठवण करून देते. 'अक्षरांचा श्रम केला' (२०००) या पुस्तकात संग्रहित झालेला प्रत्येक लेख सारंगांनी काळजीपूर्वक जोपासलेल्या पोतनिष्ठ वाचनपद्धतीची चुणूक दाखवतो. अलीकडच्या काळात मात्र सारंगांच्या समीक्षाविचाराने निराळं वळण घेतलं होतं. समाजशास्त्रीय चिकित्सा त्यांनी केंद्रस्थानी आणली होती. मराठी वाङ्मयातलं कलात्मक दुर्भिक्ष आणि अभिनव वाटा धुंडाळण्याबाबतीतली उदासीनता यांचं मूळ सारंग जातिव्यवस्थेत शोधण्याचा प्रयत्न करत होते. सारंगांच्या विचारपद्धतीत झालेला हा बदल आश्चर्यकारक होता.

आपल्या कारकिर्दीचा बराच मोठा भाग सारंगांनी परदेशांत व्यतीत केला. अमेरिका, इराक, कुवैत आदी देशांत त्यांनी वास्तव्य केलं. कथात्म साहित्यातही त्यांच्या कल्पनाशक्तीने विचित्र व अद्भुत गावं, बेटं, समुद्र, जीव व जीवनरीती अस्तित्वात आणल्या. सारंग या दोन्ही प्रकारच्या परक्या देशांत रमणारे होते. याचा परिणाम असा झाला, की 'पाश्चात्त्य संवेदनवृत्ती' लेखनातून अभिव्यक्त केल्याबद्दल त्यांचं कौतुक व अभिनंदन केलं गेलं. पण हा छुपा आरोपच आहे; सारंगांचं लेखन आपलं न मानण्याची वा समजून न घेण्याची ही तरकीब आहे. इंग्रजीतही सारंगांच्या वाट्याला हेच विशेषण वा दूषण आलं. प्राच्यवादी चष्म्यातून दिसणारं भारताचं रंगीबेरंगी वा चटकदार चित्र रंगवण्याची शक्यता चुकूनही सारंगांच्या मनात आली नाही. अस्तित्वलक्ष्यी सूत्रांचा नेकीने व निकराने पाठपुरावा करणारं त्यांचं लिखाण होतं. त्यामुळे तथाकथित 'भारतीयांचं इंग्रजी लेखन' या क्षेत्रातही ते परकेच ठरत गेले. म्हणूनच सारंगांच्या निधनाभोवती सर्वांनीच पाळलेल्या या चुप्पीचं वलय आहे.

या विलक्षण आत्मनिष्ठ लेखकाच्या एकूण लिखाणाचं थोडक्यात वर्णन करायचं झालं तर आपल्याला विट्‌गेन्स्टाइनच्या शब्दांचा आश्रय घेता येईल 'मी पाहिलेलं जग'.

◆

**प्रशान्त बागड**
prashantbagad@gmail.com



# सारंगांचं मौन!

राम रामनाथन

प्राध्यापक विलास सारंग आता आपल्यात नाहीत. १४ एप्रिलला हिंदुजा रुग्णालयात त्यांचं निधन झालं.

सॅम्युअल बेकेटनी त्यांचे अमेरिकी प्रकाशक 'द ग्रोव्ह प्रेस' यांना सारंगांच्या नावाची शिफारस केली होती. तो काळ साहित्य संमेलनांचा आणि दूरचित्रवाणी वाहिन्यांचा नव्हता, त्यामुळे सारंग कधीच 'स्टार' साहित्यिक बनले नाहीत. त्याचप्रमाणे इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांमध्ये लेखन केलेले अरुण कोलटकर आणि किरण नगरकर यांच्यासारखा 'सेलिब्रिटी' साहित्यिकाचा दर्जाही त्यांना कधी मिळाला नाही. किंवा, विंदा करंदीकर वा भालचंद्र नेमाडे यांना मराठी वाचकांच्यात जे स्थान आहे तेही सारंगांना मिळालं नाही.

हे विलास सारंग कोण होते?

ते आम्हाला मुंबई विद्यापीठात जेम्स जॉइसची 'युलिसिस' कादंबरी शिकवायचे. एका दिवसातील घटनांची सूक्ष्म नोंद करणारी ही ७८३ पानांची कादंबरी म्हणजे आमच्या अभ्यासक्रमातलं सगळ्यात कमी वाचलं जाणारं पुस्तक असावं!

'युलिसिस'बद्दल सारंगांनी तीन महत्त्वाच्या गोष्टी अधोरेखित केल्या होत्या : ती प्रायोगिक आहे, ऐतिहासिक आहे आणि अज्ञाताचा शोध घेऊन त्यातून अद्भूत प्रदेश उभा करण्याची जॉइसची क्षमता यातून दिसते. हीच वैशिष्ट्यं सारंगांच्या साहित्यालाही लागू पडतात.

उन्हाळ्यामधली त्यांची इंग्रजी एम.ए.ची व्याख्यानं स्लो मोशनमधे चालायची.

सारंग फळ्यावर 'स्नॉट ग्रीन सी' (शेंबडाळ हिरवा समुद्र) असं खरडायचे. मग दीर्घ शांतता. मग बारीक हसायचे. पुन्हा दीर्घ शांतता. जॉइसने पाण्याचा रूपक म्हणून कसा वापर केला त्याबद्दल सारंग बोलायचे. मग पुन्हा आणखी दीर्घ शांतता. वर्गात बाकी काहीच घडायचं नाही. आम्ही सगळे सारंगांकडे नजरा रोखून. ते खिडकीतून बाहेर कुठे तरी नजर रोखून. मग आणखी काही वेळ शांतता.

व्याख्यान कसं द्यावं त्याबद्दलचा हा एक कुशल परिपाठच होता. सारंगांना निद्रानाशाचा आजार असल्याची एक अफवाही होती.

मला त्यांचं लेक्चर आवडायचं. विशेषकरून त्यांचं ते अजोड मौन.. शांतता.

मी तर प्रतिज्ञाच करून टाकली, की मी कधं प्राध्यापक झालोच, तर मी माझं लेक्चर असंच देईन- साठ मिनिटांचं मौन.

मी काही वेळा त्यांना त्यांच्या केबिनमध्ये भेटलो होतो. भिंतींवर रुडयार्ड किपलिंगची काही छायाचित्रं होती, काफ्काचं एक एकाकी चित्र होतं. टेबलाव काही लिट्ल मॅगझिनं होती. त्यांची स्वतःची ओळख.. व्यवस्थित झाकली जाईल अशी तऱ्हा..

त्यांच्याशी बोलायला जायचं असेल तर ते उपलब्ध असायचेच; पण उत्तरं यायची ती फक्त एका शब्दामध्ये, आणि पाठोपाठ नेहमीचं दीर्घ मौन.

एकदा आम्हाला काय तरी नाट्यवाचनासंबधी बोलण्यासाठी त्यांच्या केबिनमध्ये जायचं होतं, तर दरवाज्यावरच आम्हाला कळलं, की 'सर इज बीझी'. सरांच्या केबिनमध्ये झेक स्लोवाकियाचे मिरोस्लाव होलुब, हंगेरीचे फेरेन्स जुहास्ज, निकाराग्वाचे अर्नेस्टो कार्डिनल आणि मुंबईतलेच आदिल जसावाला बसलेले होते. हे सर्व दर्जेदार कवी होते.

दुसऱ्या दिवशी आम्ही सरांना विचारलं, की तेव्हा केबिनमध्ये काय खलबतं चाललेली?

सर माफक हसले, आणि मग.. शांतता.



## सुमनांजली

**मुंबईस्थित रामू रामनाथन हे इंग्रजी नाटककार असून त्यांचा सदर लेख तेच संपादित करत असलेल्या 'प्रिंटवीक इंडिया' या नियतकालिकात प्रसिद्ध झाला होता. त्यानंतर 'मुंबई मिरर' या वृत्तपत्रातही हा लेख पुनर्मुद्रित झाला. डॉ. विलास सारंगांचा विद्यार्थी म्हणूनच्या काही आठवणी रामनाथन यांनी या लेखात जागवल्या आहेत. मराठीबाहेरच्या साहित्यिक वर्तुळातील एका व्यक्तीच्या मनात सारंगांचं काय स्थान आहे याबद्दल वाचणं कदाचित मराठी वाचकांनाही रोचक वाटेल, म्हणून या लेखाचं भाषांतर इथे प्रसिद्ध करीत आहोत.**

त्यांची साहित्यिक रुची केवळ जॉइस आणि बोर्हेस अशी पश्चिमेकडे कलणारी नव्हती. भालचंद्र नेमाडे, किरण नगरकर, कमल देसाई व चिं. त्र्यं. खानोलकर आदींच्या लेखनाची समीक्षा करणारी एक पुस्तिका ही त्यांनी प्रकाशित केली होती. बा. सी. मर्ढेकरांच्या प्रभावाचा उल्लेख ते नेहमी करायचे. सोबत गंगाधर गाडगीळ आणि व्यंकटेश माडगूळकरांचाही संदर्भ यायचा.

मराठीत त्यांच्या 'एन्कीच्या राज्यात' या नावाने प्रकाशित झालेल्या कादंबरीचं इंग्रजी रूप 'इन द लँड ऑफ एन्की' सीगल बुक्सने प्रकाशित केली, तर पेंग्विनने 'फेअर ट्री ऑफ द व्हॉइड' हा त्यांचा कथासंग्रह प्रकाशित केला.

सारंगांची 'अ रिव्होल्ट ऑफ द गॉड्स' ही कथा वाचल्यानंतर माझा गणपती विसर्जनाच्या घटनेकडे बघण्याचा दृष्टिकोन कायमचाच बदलून गेला. या कथेमध्ये मुंबईतील गणेशमूर्ती जिवंत होतात आणि गणेशोत्सवाच्या अखेरीला होणारं विसर्जन टाळण्यासाठी लपून बसण्याचा निर्णय घेतात.

भारतातील इंग्रजी माध्यमांमधील टीकाकार सारंगांची साहित्यिक शैली काफ्काच्या प्रतिमासृष्टीशी जोडू पाहतात, हे विचित्र आहे. वास्तविक त्यांचं काम याहून बरंच काही आहे. त्यांच्या 'ऑन द स्टोन स्टेप्स' या कथेत एका नमुनेदार शिक्षकाला, तो ज्या शाळेत विद्यार्थी होता त्याच शाळेत रुजू व्हायला लागते त्याची गोष्ट आहे. इथे एक फटकारा मारून पु. ल. देशपांड्यांच्या 'बटाट्याची चाळ'मधली पात्रं सारंग उलटीपालटी करून टाकतात.

दिलीप चित्र्यांनी म्हटलंय तसं- 'त्यांचं कथात्म साहित्य हे अद्भूत प्रतिपादनासह तपशीलवार व 'वास्तववादी' कथन घेऊन येतं. सारंगांचं तंत्र आणि त्यांचे विषय यांची बीजं शोधण्यासाठी हिस्पॅनिक अमेरिकेत जायची गरज नाही. आपल्यापैकी बहुतेकांप्रमाणे तेही भारतीय पुराणं, पाली व प्राकृत अभिजात वाङ्मय, आदिवासी व ग्रामीण संस्कृतीतील संपन्न मौखिक परंपरा यांचे वारस आहेत. सध्याचे तरुण सर्जनशील लेखक मात्र या बीजांचा वापर करताना क्वचितच दिसतात.'

मुंबई विद्यापीठातला काळ संपल्यानंतर आमचा त्यांच्याशी संपर्क तुटला. सर आता कुवैतमध्ये विद्यापीठात इंग्रजी भाषेचे प्राध्यापक म्हणून आहेत, असं मधेच कधी तरी कळलं. अतिशय कठोर शहरं निवडण्याचं काही तरी गूढ कसब त्यांच्यामधे होतं. बैरत काय नि बसरा काय, आणि त्यांच्याच मिश्किल शब्दांत सांगायचं, तर 'सगळ्यात संकटग्रस्त असलेला प्रदेश (मुंबई विद्यापीठाचा)- कलीना कॅम्पस'.

काही वर्षांपूर्वी अर्धांगवायूचा झटका आल्यानंतर ते एकान्तवासातच राहिले.

हिंदुजा रुग्णालयात दाखल केलं तेव्हा त्यांना श्वास घेता येत नव्हता.

त्यांनी त्यांच्या मृत्यूची वेळही सुंदरपणे निवडली असं वाटतं.. १४ एप्रिल. १९०६ साली बेकेटचा जन्म ज्या दिवशी झाला त्यानंतरचा दिवस.

प्रश्न : सर, तुम्ही हे जाणूनबुजून केलंत काय?

उत्तर: .. दीर्घ शांतता.

विराम.

सर, मे यू रेस्ट इन पीस.

◆


मराठी अनुवाद : **अवधूत डोंगरे**<br>
भ्रमणध्वनी : ९४२१२२९२५१<br>
dongareavadhoot@gmail.com













# सुमनांजली

**राज्यशास्त्राचे ख्यातनाम प्राध्यापक, आंतरविद्याशाखीय दृष्टी असणारे गाढे अभ्यासक, विवेकशील पुरोगामी विचारवंत, कृतिशील भाष्यकार, वैचारिक साहित्यकार, विद्यार्थीप्रिय शिक्षक, चळवळी आणि कार्यकर्त्यांचा भक्कम आधार असलेल्या डॉ. यशवंत सुमंत यांचे अलीकडेच निधन झाले.**

**डॉ. सुमंत यांच्या बहुपेडी व्यक्तिमत्त्वावर आणि कार्यकर्तृत्वावर त्यांच्याच एका जवळच्या मित्राने टाकलेला हा दृष्टिक्षेप.**

हाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या मागील अंकात साहित्यसंमेलनाध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांच्यावरील माझा लेख प्रसिद्ध झाला. या लेखात डॉ. मोरे, डॉ. यशवंत सुमंत आणि मी अशा तिघांच्या मैत्रीविषयी काही मजकूर होता. आम्हा तिघांच्या निवृत्तीनंतरच्या प्रवृत्तीपर प्रवासाविषयीचे स्वप्नही मी नमूद केले होते. पण हा लेख प्रसिद्ध होऊन जेमतेम दहा-बारा दिवस झाले असतील एवढ्यात यशवंत सुमंत या आमच्या मित्राला काळाने आमच्यातून ओढून न्यावे, हा केवळ दैवदुर्विलास! मृत्युपूर्वीच्या त्याच्या आजारपणात माझ्या स्वतःच्या 'व्हायरल' दुखण्यापायी मी त्याला भेटू शकलो नव्हतो. त्याच्या जाण्याची वातमीसुद्धा मला हैद्राबाद-पुणे रेल्वे प्रवासातच मिळाली. पुण्याला पोहोचलो तो थेट 'वैकुंठा'त त्याचे अंत्यदर्शनच घ्यावे लागले. माझ्या आयुष्यातील आत्यंतिक दुःखाचा हा प्रसंग. हे दुःख केवळ व्यक्तिगत नाही, तर त्याला सामाजिक संदर्भसुद्धा आहे. यशवंत सुमंत हे राज्यशास्त्राचे ख्यातनाम प्राध्यापक आणि सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठातील विभागप्रमुख. आंतरविद्याशाखीय दृष्टी असणारे गाढे अभ्यासक. विवेकशील पुरोगामी विचारवंत. कृतिशील भाष्यकार. चळवळी आणि कार्यकर्त्यांचा भक्कम आधार. विद्यार्थ्यांसाठी दिशादर्शक आणि सहृदय शिक्षक व सर्वांना हवाहवासा दिलदार माणूस... अशा व्यक्तीचे साठीच्या आतच जाणे ही संबंधितांसाठी व्यक्तिगत हानी तर आहेच, पण मोठी सामाजिक हानीसुद्धा आहे.

आधी व्यक्तिगत संदर्भात चार शब्द. यशवंतची-माझी मैत्री सुमारे पाव शतकाची. विशेषतः आम्ही दोघे पुणे विद्यापीठात शिकवू लागल्यापासूनची. आम्ही नुसते समवयस्क नव्हतो, तर बरेचसे समविचारीसुद्धा होतो. आमचे स्वभावधर्म परस्परांशी खूप जुळणारे. एका इमारतीत काम करत असूनसुद्धा रोज भेटत होतो अशातला भाग नाही. किंबहुना, कधी भेटलो की निघताना "आता निवांत भेटू" हे वाक्य उच्चारून आम्ही खळखळून हसायचो. कारण हा निवांतपणा दोघांच्याही नशिबी फारसा येतच नसे! भेटीची वारंवारिता हा मैत्रीचा निकषच नव्हता आमचा. "राजा, जरा येतोस का? अविनाश आवलगावकर येऊन बसलेत. आधुनिक भारतातल्या धर्मविचारावर नामदेव अध्यासनाच्या चर्चासत्राची आखणी चाललीय. तू असशील तर बरं पडेल..." किंवा "यशवंत, लाभसेटवार व्याख्यानमालेसाठी तू अध्यक्ष आहेस, लक्षात आहे ना? व्याख्यानाआधी माझ्या ऑफिसमध्ये चहाला ये. रझिया पटेल आणि लाभसेटवारही असतील..." अशी आमची निमित्ते असत. पण खरे तर पुण्यापेक्षा पुण्याबाहेरच आम्ही निवांतपणा अनुभवायचो. किशोर बेडकिहाळ यांच्यासारख्या मित्रांमुळे व्याख्यानासाठी सातारा-वारी करायची म्हणजे जाता-येता गप्पांची मैफलच. 'दाजीबा देसाई लेखसंग्रहा'च्या प्रकाशनसमारंभाच्या निमित्ताने किशोर आणि अन्य काही मित्रमंडळींसह झालेली आमची बेळगाव-भेट तर अवर्णनीयच होती. सुमारे वर्षभरापूर्वी कलकत्ता विद्यापीठाच्या निमंत्रणावरून राष्ट्रीय चर्चासत्रासाठी तेथे गेलो तेव्हा यशवंतची-माझी हॉटेलची खोली एकच होती. त्यामुळे आम्ही दोघांनी सलग दोन-तीन दिवस गप्पापुराणापासून मत्स्यपुराणापर्यंत जी काही मजा केली, ती विचारायलाच नको! व्यक्तिगत सुख-दुःखांपासून 'विश्वाच्या चिंते'पर्यंत, साहित्य-संगीतापासून स्त्रीवादापर्यंत, 'ग्रामायन'पासून मुस्लिम



अनुक्रमणिका



# यशवंत सुमंत : वैचारिक साहित्यकार

■ राजा दीक्षित



ओबीसी चळवळीपर्यंत, जातिअंतापासून 'इतिहासाच्या, विचारप्रणालीच्या अंता'पर्यंत, बुद्ध-चार्वाकांपासून मार्क्स-फुले-आंबेडकरांपर्यंत, क्रांतिकारकांपासून गांधींपर्यंत कशाकशावर म्हणून बोलत असायचो आम्ही! बहुव्यापी गोष्टींमध्ये आम्हाला फार रस. त्यामुळे एकदा मोरे, सुमंत, हिंदीच्या शशिकला राव आणि मी आंतरराष्ट्रीय कीर्तीचे चित्रकार-मित्र भास्कर हांडे यांच्या घरी गेलो. विठ्ठल, वारी, अभंग अशा विषयांवरची घरातच सजलेली त्यांची देखणी गॅलरी पाहून पोटभर गप्पा मारल्या. मराठी संस्कृतीच्या अजोड पैलूचे ते कलात्मक दर्शन कायम स्मरणात राहील. 'एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र : मध्यमवर्गाचा उदय' या माझ्या प्रबंधाच्या प्रकाशन समारंभात यशवंत अतिशय आस्थेने आणि तरीही वस्तुनिष्ठपणे बोलला होता. त्या प्रसंगाला त्याच्याइतका योग्य वक्ता कोण असू शकत होता? सखोल अभ्यास, विवेकशीलता आणि सुस्पष्ट व प्रभावी संवाद ही त्याच्या वक्तृत्वाची वैशिष्ट्ये होती. कृत्रिम अलंकरण आणि लोकानुरंजन यांचा स्पर्शही त्यामध्ये आढळून येत नसे. ताणयुक्त व्याप, सततचे दौरे आणि भाषणे यांमुळे त्याचे लेखन मात्र तुलनेने मागे पडत असे. प्रकृतीही दगा देत असे. मी नेहमी याबाबत त्याच्याजवळ प्रेमळ तक्रार करायचो. प्रचंड व्यस्ततेतूनसुद्धा लेखन कसे पुढे न्यावे याचे उत्तम उदाहरण म्हणजे सदानंद मोरे. तशा प्रकारचा लेखनाचा झपाटा आम्हा दोघांकडे कधीच नव्हता. यशवंत हा उत्तम, तरीही बेभरवशाचा गडी! एकदा माझ्या मध्यस्थीने एका महत्त्वाच्या व्याख्यानमालेत यशवंतचे व्याख्यान ठरले आणि आयत्यावेळी त्याच्या अडचणीमुळे संयोजकांनी मलाच पकडून व्याख्यानाला उभे केले! कबूल केलेला लेख अखेरपर्यंत दिला नाही म्हणून एका विशेषांकाच्या संपादकांनी अनुक्रमणिकेत यशवंतचे नाव छापून त्यापुढील पृष्ठक्रमांक कोरे ठेवण्याचा किस्साही घडलेला आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'वाङ्मयेतिहासा'साठी वैचारिक वाङ्मयावरचा लेख यशवंत पूर्ण करू शकला नाही, याची मला आजही हळहळ वाटते. सौजन्यमूर्ती संपादक प्रा. रा. ग. जाधव यांनी माझ्यामार्फतच त्याला किती तरी आर्जवी निरोप धाडले होते; पण लेख राहिला तो राहिलाच. 'भरवशाचा गडी' नसूनही मी यशवंतवर कधी फारसा रागावू शकलो नाही. कारण त्या वस्तुस्थितीमागील रहस्य मला पुरेपूर माहिती होते. येथेच मी त्याच्या मृत्यूने झालेल्या सामाजिक हानीकडे वळतो.

शिक्षक तीन प्रकारचे असतात. निव्वळ पोटार्थी शिक्षक 'पाट्या टाकून' मोकळे होतात आणि शिक्षकी पेशाची प्रतिमा खराब करतात. दुसऱ्या प्रकारचे शिक्षक शिकवण्याचे काम उत्तम प्रकारे पार पाडतात; पण त्यांना बिनभिंतीची शाळा दिसत नाही आणि समाजासाठी त्यांच्या मनाची उलघाल होताना दिसत नाही. तिसऱ्या प्रकारचे शिक्षक मात्र अभ्यासाची आणि सामाजिक अशी दुहेरी बांधिलकी मानतात. ते एका अर्थी समाजशिक्षकसुद्धा असतात. अनेकांना आपलेसे वाटत असल्याने ते सर्वांच्या अपेक्षांच्या ताणलेल्या जाळ्यात अडकलेले असतात. दहा हात नसूनही ते तसे असल्यासारखी कामे अशा व्यक्ती करत राहतात. स्वतःच्या कुटुंबावर अन्याय करावा लागतो; स्वतःवरसुद्धा खूप अन्याय करावा लागतो. शारीरिक व मानसिक असे दुहेरी ताण सतत सोसावे लागतात. या सर्वांतून वाट काढत हे शिक्षक आपला व्यवसाय नेकीने करतात आणि समाजासाठीसुद्धा सतत हरप्रकारे धडपडत राहतात. सुमंत हे या कोटीतले शिक्षक होते. कधी कधी












डोकावणारा त्यांचा 'वेभरवसा' हा लबाडीतून, शिष्टपणातून किंवा मोठेपणाच्या प्रदर्शनातून उद्भवलेला नव्हता. कारण मुळात तो सच्च्या दिलाचा साधा माणूस होता. काळ-काम-वेगाचा मेळ घालताना काही वेळा त्यांचे गणित चुकत असे. काही गणिते चुकली तरी ज्यांचे गुणपत्रक रिकामे नसते, अशा रक्त आटवून काम करणाऱ्या, झोकून देणाऱ्या अवलिया पंथाचे यशवंत सुमंत हे पाईक होते. म्हणूनच प्रा. राम वापट, प्रा. गो. पु. देशपांडे यांच्यासारख्यांची पिढी जवळपास अस्तंगत झाल्यानंतरच्या काळात, चळवळींच्या ऱ्हासाच्या युगात, उत्तराधुनिक विसंगतींच्या व नव-दुरितांच्या ग्रस्ततेत व व्यस्ततेत प्रा. सुमंत यांचे गमन म्हणजे मोठी सामाजिक हानी आहे.

प्रा. सुमंत यांच्या विद्वत्तेचा पोत लक्षात घेता त्यांच्या हातून मोठे ग्रंथलेखन झाले असते तर ते बहुमोल ठरले असते; पण आता ती शक्यता दुरावल्यामुळे त्यांच्या विपुल अशा स्फुट लेखनाचाच आधार यापुढे घ्यावा लागेल. फार तर या लेखनातून काही संपादित ग्रंथ तयार होऊ शकतील. त्यांच्या विद्यार्थिनी डॉ. चैत्रा रेडकर यांच्यासारख्या व्यक्ती तशा प्रयत्नात आहेत. छोट्या लेखाच्या मर्यादेत सुमंत यांच्या समग्र लेखनाचा परिचयसुद्धा करून देणे अवघड आहे. ते सर्वच लेखन बारकाईने वाचल्याचाही दावा नाही. पण जे वाचत आलो त्यावरून काही निरीक्षणे तेवढी थोडक्यात नोंदवतो. सुमंत यांच्या विचारविश्वाचा रंगपट विशाल होता. ते राज्यशास्त्राचे प्राध्यापक असल्याने त्या शास्त्राशी संबंधित लेखन त्यांनी स्वाभाविकपणे केलेले आहे. पण एका व्यापक परिप्रेक्ष्यातून ते राज्यशास्त्राकडे पाहत असल्याने आणि अंगभूत आंतरविद्याशाखीय दृष्टीमुळे त्यांनी धर्मचिकित्सा, जातिमीमांसा, स्त्रीवाद आणि एकंदरीतच आधुनिक भारतातील, विशेषत महाराष्ट्रातील विचारमंथन या विषयांवर विपुल लेखन केलेले आहे. हे लेखन निव्वळ वर्णनपर नाही. ते चिकित्सक, अन्वयार्थी, सर्जनशील व विचारप्रवर्तक आहे. राष्ट्रवाद, उदारमतवाद, समाजवाद-साम्यवाद, फुले-आंबेडकर व गांधीवाद यांसारख्या विचारप्रणाली आणि कार्ल मार्क्स, म. फुले, न्या. रानडे, आगरकर, महर्षी शिंदे, विवेकानंद, स्वा. सावरकर, डॉ. आंबेडकर, म. गांधी, विनोबा भावे, साने गुरुजी, राम मनोहर लोहिया इ. विचारवंत, सुधारक, नेते यांच्या संदर्भाने प्रा. सुमंत यांनी वेळोवेळी केलेल्या भाष्यांवर त्यांची स्वतःची अशी वेगळी छाप आहे.

यशवंत सुमंत हे महाराष्ट्र राज्यशास्त्र व लोकप्रशासन परिषदेच्या २९व्या अधिवेशनाचे (तासगाव, २०१२) अध्यक्ष होते. त्यांच्या बावन्नपानी अध्यक्षीय भाषणावरून राज्यशास्त्रविषयक त्यांच्या मर्मदृष्टीची प्रचिती येते. अशा परिषदा कशा रीतीने आयोजित कराव्या याविषयी त्यांचे परखड व सकारात्मक दिग्दर्शन अन्य विषयांच्या परिषदांसाठीसुद्धा विचारार्ह आहे. राज्यशास्त्राला एकाच वेळी मूल्यात्मक (नॉर्मेटिव्ह), अनुभववादी (एम्पिरिकल) आणि व्यवहारात्मक (प्रुडेन्शियल) असे तीन आयाम असताना त्यांच्या एकात्मिक विकासाची गरज अधोरेखित करून सम्यक राज्यशास्त्राच्या विकासाची दिशा प्रा. सुमंत सूचित करतात. भारतीय लोकशाहीचे चर्चाविश्व प्रामुख्याने कोणत्या मुद्द्यांभोवती गुंफले गेले आहे, त्यातील महत्त्वाचे टप्पे व प्रवाह कोणते आणि जागतिकीकरणाच्या पर्वात ते कोणत्या दिशेने विकसित होणार आहेत व व्हावेत - या बाबींचा ऊहापोह करून भारतीय लोकशाहीचे बहुपदरी रूप त्यांनी उलगडून दाखवले आहे.

जातिनिर्मूलन हा प्रा. सुमंत यांच्या आस्थेचा विषय. त्याबाबतच्या लेखनातून त्यांचे प्रगल्भ चिंतन प्रकट होत आहे. 'महाराष्ट्रातील जातिव्यवस्थाविषयक विचार' या डॉ. दत्तात्रय पुंडे यांच्यासह संपादित केलेल्या ग्रंथाची (१९८८, दु. आ. २००६) डॉ. सुमंत-लिखित प्रस्तावना जिज्ञासूंनी अवश्य वाचावी. त्यानंतरच्या जातिनिर्मूलनविषयक लेखांमध्येसुद्धा ढोबळ घोषणावाज सुरात ते कधीच बोलत नाहीत. सुधारणावादी चळवळींचे वर्गीकरणात्मक विश्लेषण करून ते जागतिकीकरणाच्या व्यामिश्र संदर्भाचासुद्धा विचार करतात. जातींची व जातिव्यवस्थेची बदलती रूपे आणि बदलत्या भौतिक वास्तवात तिची बदलत जाणारी सामाजिक-सांस्कृतिक व उत्पादनाच्या संदर्भातील कार्ये यांचाही सूक्ष्म विचार करण्यावर ते भर देतात. संरचनात्मक, व्यावहारिक /आंदोलनात्मक आणि तात्त्विक अशा तिन्ही संदर्भात ते जातिव्यवस्थेविषयी लिहितात. जातींचे राजकीयीकरण घडले, पण लोकशाहीकरण मात्र न झाल्याने काही विसंगतींनी कसा जन्म घेतला याबाबतचे त्यांचे प्रतिपादन महत्त्वाचे आहे. ('साधना', २८ एप्रिल २००७). फुले-आंबेडकर आणि गांधी यांच्या भूमिका विचारात घेऊन ते महत्त्वाचा विचार मांडतात : "जातिअंताच्या दृष्टीने आणि जातिवास्तवाच्या संदर्भात आपल्याला आता एकाच वेळी अंत:संघर्ष आणि बाह्यसंघर्ष करावे लागतील. अंत:संघर्षातून आपल्याला आपला नैतिक आवाज ऐकण्याची क्षमता प्राप्त होईल व ती आपल्याला बाह्यसंघर्षासाठी लागणारी आंतरिक ऊर्जा पुरवेल; बाह्यसंघर्षातून आपल्याला व्यवस्थेशी दोन हात करण्याचे धैर्य, सामाजिक रोष व दमनाला तोंड देण्यासाठी लागणारी हिंमत व कृतिप्रवणता प्राप्त होईल." ('साधना', १२ मे २००७).



स्त्रीवाद हा प्रा. सुमंत यांच्या आस्थेचा आणखी एक विषय. 'मिळून साऱ्याजणी'मध्ये त्यांनी १९९९ साली लिहिलेली लेखमाला आणि विद्या बाळ कार्यगौरवार्थ प्रकाशित झालेल्या 'संदर्भासहित स्त्रीवाद' (२०१४) या ग्रंथातील 'आधुनिक भारताच्या राजकीय तत्त्वचिंतनातील स्त्रीप्रश्नांची जाण' या त्यांच्या सुमारे पन्नास पृष्ठांच्या लेखावरून त्यांच्या याबाबतच्या विचारांची दिशा समजते. स्त्रीवादाचा इतिहास आणि इतिहासातील स्त्रीवाद यांचा सखोल अभ्यास त्यांनी केला होता. याबाबतची पाश्चात्त्य परंपरा आणि आधुनिक भारतीय परिदृष्टी या दोहोंचीही प्रगल्भ जाण त्यांच्या लेखनात प्रकटते. स्त्रीमुक्तीचे समतावादाशी आणि मानवमुक्तीशी जे नाते त्यांनी जोडले ते महत्त्वाचे आहे. त्याची ही एक झलक : "स्त्री-मुक्तीचा लढा हा एकाच वेळी स्त्रीवर्गाच्या मुक्तीचाही लढा आहे व स्त्री-पुरुष समतेचा तसेच स्त्रीवर्गांतर्गत स्त्री-समतेचाही लढा आहे. इतकेच नव्हे, तर तो सर्व शोषित व दडपलेल्या वर्गांचाही लढा आहे आणि सर्वंकष समतेसाठीचाही लढा आहे. त्याच्या अंगी स्वत:च्या वतीने स्वत:साठी बोलण्याची तसेच सर्वांच्या वतीने व सर्वांसाठी बोलण्याची हमी व क्षमता निर्माण होणे गरजेचे आहे. तशी ती निर्माण होण्यातूनच तो मानवमुक्तीची ग्वाही देऊ शकतो" ('मिळून साऱ्याजणी', जाने. १९९९). जात-वर्ग-लिंगभाव यांचे सम्यक भान प्रा. सुमंत यांना होते.

प्रा. यशवंत सुमंत यांचे व्यक्तिविषयक लेखन व्यक्तिपूजक नसून वेगळा अन्वयार्थ मांडणारे, वेगळी दृष्टी देणारे आहे. 'महापुरुषांच्या अपहरणा'च्या सध्याच्या युगात सुमंत यांची 'स्वामी विवेकानंद - साधक की हिंदुत्वाचे प्रचारक' ही पुस्तिका (ऑगस्ट २०००) तिच्या वेगळेपणाने उठून दिसते. विवेकानंदांच्या एकारलेल्या उजव्या प्रतिमेला छेद देणारी प्रतिमा प्रा. सुमंत अभ्यासपूर्ण मांडणीतून समोर ठेवतात. 'हिंदुत्वाचे प्रचारक व प्रवक्ते' याऐवजी 'साधक' या त्यांच्या प्रतिमेवर प्रा. सुमंतांनी भर दिलेला आहे. त्यांच्या मते, विवेकानंदांच्या व्यक्तिमत्त्वात आढळून येणारा अंतर्विरोध हे तत्कालीन वसाहतकालीन समाजवास्तवाचे प्रतिबिंब आहे. महात्मा गांधी यांच्याविषयी मराठीत आजवर जी मांडणी झाली तिच्यामध्ये सुमंत यांनी वैशिष्ट्यपूर्ण भर टाकली आहे. याचे उत्तम उदाहरण म्हणजे 'बहुजनवादी गांधी' हा त्यांचा लेख. ('साधना', २९ जाने. २०००). या लेखात गांधीजींची बहुजनवादी ओळख त्यांनी ठसवली आहे; एवढेच नव्हे, तर फुले-आंबेडकरांच्या बहुजनलक्ष्यी राष्ट्रवादाशी तिची सांगड घातली आहे. गांधींच्या अतिशूद्रांशी असणाऱ्या बांधिलकीबाबत सुमंत म्हणतात, "त्यांच्या या बांधिलकीचे मूळ त्यांच्या धर्मभावात असलेही; पण हा धर्मभाव मोक्षलक्ष्यी नसून न्यायलक्ष्यी होता. मोक्षलक्ष्यी धर्मभाव व्यक्तीला आत्ममग्न बनवतो. न्यायलक्ष्यी धर्मभाव अन्याय आणि विषमतेच्या विरोधात व्यक्तीला सामाजिक हस्तक्षेप करायला लावतो. म्हणूनच गांधी अस्पृश्यतानिर्मूलन ही स्वराज्याची पूर्वशर्त मानतात. हिंदू-मुसलमान ऐक्य आणि सवर्ण-अवर्ण ऐक्य झाल्याशिवाय स्वराज्य संभवणार नाही, असे गांधींनी १९२० सालीच जाहीर केले होते. तात्पर्य, गांधींची ऐक्याची कल्पना फुल्यांच्या 'एकमय राष्ट्राचा' संकल्प होता." 'गांधी-आंबेडकर : कृतक संघर्ष' संपवण्याच्या दिशा' हा सुमंतांचा आधीचा लेखसुद्धा ('समाज प्रबोधन पत्रिका, जाने.-मार्च १९९५) विचारप्रवर्तक आहे. प्रा. गं. बा. सरदारांचा अपवाद वगळता गांधी-आंबेडकरांविषयीची एवढी पद्धतशीर मित्रभावी मांडणी मराठीत अन्य कोणी केलेली नाही. ही मांडणी ढोबळ समरसतावादी नाही. प्रा. सुमंत यांना अभिप्रेत असणारा गांधी-आंबेडकर समन्वय हा द्वंद्वात्मक (डायलेक्टिकल) आहे.

एका चर्चासत्रातील सादरीकरणावर आधारित 'मराठी वैचारिक साहित्य : स्वरूप आणि प्रेरणा' हा प्रा. सुमंत यांचा लेख ('नवभारत', मार्च-एप्रिल १९९७) उल्लेखनीय आहे. लेखाचा विषय हेच मुळात एक शिवधनुष्य आहे. त्याला हात लावू पाहणारा तशाच कुवतीचा पाहिजे. सुमारे दहा पानांमध्ये विषय मांडण्याची कसरत सुमंत यांना करावी लागली. पण ती त्यांनी कौशल्याने केली आहे. लेखात उल्लेखिलेल्या एकेका विचारवंतावर स्वतंत्र प्रबंध लिहिता येतील. सुमंतांना मात्र त्यांच्याविषयी दोन-चार परिच्छेदांत सारभूत मांडणी करावी लागली आहे. "मार्क्सवादी विश्लेषणपद्धतीची सर्जनशील क्षमता ध्यानात येते ती बेडेकरांच्यामुळे", एवढे एक विधानसुद्धा प्रा. दि. के. बेडेकर यांच्याविषयी खूप काही सांगून जाते. या पद्धतीने लिहिलेला असूनही तो लेख पूर्ण समाधान देत नाही. कारण कितीही चांगला असला तरी अखेर तो धावता आढावाच आहे. मात्र, या विषयावर विस्तृत लेखन करण्याची प्रा. सुमंतांची क्षमता त्या लेखाने दाखवून दिली. 'मसाप'च्या वाङ्मयेतिहासासाठी असे लेखन करण्यासाठीचा वेळ आणि स्वास्थ्य त्यांना मिळाले असते तर ती क्षमता सिद्धही झाली असती. असो. एक मात्र नक्की, की यापुढे असा लेख कोणी लिहिला तर त्या व्यक्तीला प्रा. यशवंत सुमंत यांच्या प्रबोधनपर वैचारिक लेखनाची दखल घ्यावी लागेल.

◆

**डॉ. राजा दीक्षित**
भ्रमणध्वनी : ९७६७७८९५४
smrajadixit@gmail.com



अनुक्रमणिका



सुमनांजली




# अधुऱ्या राहिलेल्या अनवट इच्छा

प्रियांका डहाळेच्या 'अनावृत रेषा' या कवितासंग्रहातील पहिली कविता असो वा शेवटची. प्रत्येक कवितेचे असे एक खास वेगळेपण आहे. प्रत्येक कवितेची अशी एक भाषा आहे. ती भाषा कवितेच्या आशयानुरूप स्वत:ला घडवत नेते, अधिकाधिक समृद्ध होत जाते. मुख्य म्हणजे संवेदना हरवत चालल्याचं दु:ख प्रियांका आपल्या कवितेमधून फार जोरकसपणे मांडते. काळ बदलत चाललाय याबद्दल आपण ओरडत सुटतोय आणि आपल्या अवतीभवतीचं कोपऱ्यातलं एखादं कोवळं रोप सुकून जातं, तेव्हा आपल्याला वेळही नसतो त्या सुकल्या जीवाकडे पाहायला आणि आपण आपल्याच मस्तीत दंग असतो, ही विसंगतीही ती आपल्यासमोर मांडते.

'अनावृत रेषा' या संग्रहाचं मुखपृष्ठ प्रख्यात चित्रकार शुभा गोखले यांचं आहे. मुखपृष्ठावर शुभा गोखले यांनी रेखाटलेलं चित्र आहे. शुभाताईंनी याआधी कवी ग्रेस यांच्या कवितेला आपली चित्रं दिली होती. शुभा गोखले यांनी चित्र वापरण्याची परवानगी दिली हा आपला बहुमानच आहे, अशी भावना प्रियंका आपल्या मनोगतात व्यक्त करते. कवितेचा आशय अधिक समृद्ध करणारं हे चित्र आहे. संग्रहाला चित्रा मुद्‌गल यांची प्रस्तावना आहे. व्यास सन्मानाने सन्मानित समकालीन हिंदी साहित्यातील ज्येष्ठ व मान्यवर कादंबरीकार असलेल्या चित्राजींनी प्रियांकाच्या प्रेमाखातर आपुलकीच्या भावनेने 'अनावृत रेषा' या संग्रहातील कवितांना आपल्या साक्षेपी विचारांची जोड दिली. चित्राजींची प्रस्तावना मिळाल्यामुळे प्रियांकाला विशेष आनंद झाला होता. तसे तिने मला बोलूनही दाखविले होते. चित्राजींशी प्रियांकाचा नियमित संपर्क होता.



संग्रहाच्या मलपृष्ठावरील अभिप्रायही आपल्याला प्रियांकाची कविता समजून घेण्यास मदतगार ठरतो. खरं तर रेषांना स्वत:चं अस्तित्व नसतं; पण त्यांच्यातूनच विचारांना, अनुभूतींना आणि भावनांना आकार येतो. या रेषा परंपरांच्या असोत, विचारांच्या असोत, शरीराच्या असोत... त्यांच्यात एक लक्ष्मणरेषा कायम







प्रियांका डहाळे या तरुण पत्रकार-कवयित्रीचं नुकतंच अपघाती निधन झालं. एक अस्सल मनस्वीपण घेऊन आलेली आश्वासक कवयित्री काळाच्या पडद्याआड गेली.

या कवयित्रीच्या कवितेवर भाष्य करणारा विष्णू जोशी यांचा लेख, तसेच स्वतःच्या कवितेविषयी प्रियांकाने व्यक्त केलेलं मनोगत इथे प्रसिद्ध करीत आहोत.

**विष्णू जोशी**

दडलेली असते. ती ओलांडण्याचं काम प्रियांका डहाळे हिच्या कवितांनी केलं आहे. स्त्रीचा व्यक्ती म्हणून विचार करणारी, तिच्या मनोभावनांना अनावृत करणारी आणि तिच्या अस्तित्वाला नवा आयाम देऊ पाहणारी तिची कविता आहे. वर्तमानातील आपलं स्थान शोधून, परंपरांची क्षितिजं ओलांडून आपल्या अंतर्मनाशी संवाद साधू पाहणारी तिची कविता आहे. यातील निर्व्याज निर्भयता आणि निःसंकोच मोकळेपणा यामुळे तिच्या कविता वाचताना त्यातील निखळ अभिव्यक्तीशी वाचक सहज जोडला जातो. मानवी भावजीवन रेखाटणाऱ्या आणि देहातीत होऊ पाहणाऱ्या या कविता वाचकांच्या मनावर आपल्या असतेपणाचा ठसा उमटवून जातात.

'दिव्य मराठी'च्या रसिक पुरवणीतील सदराच्या निमित्ताने प्रियांकाची ज्येष्ठ चित्रकार प्रभाकर कोलते सरांशी चांगलीच ओळख निर्माण झाली होती. तिने तिचा संग्रह कोलते सरांना भेट दिला. त्यांनीही संग्रह आत्मीयतेने वाचला. ते म्हणाले, ''तुझी कविता मुक्त आहे आणि मुक्तच राहू दे. नोकरी पोट भरण्यासाठी जरूर कर, पण तिला साइड बिझनेस समज नि कवितेला पूर्णवेळ बांधील रहा. इतके तुझ्यात कवित्व भरलेले आहे.'' कोलते सरांची ही प्रतिक्रिया प्रियांकाला खूप महत्त्वाची वाटली होती. तिने याविषयी फेसबुकवर लिहिले होते, की 'कवितेला शरण जावं, तिच्यापाशी स्वतःला समर्पण करावं, बेफिकीर व्हावं असं कित्येकदा वाटत असतं. कोलते सरांनी नेमकं तेच बोलून दाखवलं आणि माझा माझ्यावरचा विश्वास त्यांनी नव्याने वाढवला.'

बा. सी. मर्ढेकर, ग्रेस, दि. पु. चित्रे, अरुण कोलटकर, नामदेव ढसाळ, भालचंद्र नेमाडेयांची कविता प्रियांकाने अनेकदा वाचली होती. या कवींविषयी, त्यांच्या कवितांविषयी ती अधूनमधून फोनवर बोलतही असे. तिने संग्रहाच्या अर्पणपत्रिकेत ग्रेस यांच्या खालील चार ओळी दिल्या आहेत-

*बांधिता नदीवर भिंत*
*डोहात उतरती रंग*
*पाण्याला सजवुनि द्यावे*
*पाण्याचे स्वप्नतरंग*

आणि 'माझी स्वप्ने मुक्तपणे बांधू देणाऱ्या सर्वांना' तिचा हा संग्रह तिने अर्पण केलाय.

'शब्दांविषयी'चं कुतूहल निर्माण झालं तेव्हापासून शब्दच जगवतात मला, असं ती म्हणते. तर कधी कधी शब्द घाबरवतात, रहस्य निर्माण करतात स्वतःबद्दल. पण त्यातही आश्वस्त वाटतं मला. भवतालचा अशाश्वत कचरा स्वच्छ करण्यासाठी शेवटी शब्दच हाती असतात माझ्या. ह्या शब्दांची कास घेऊनच समकालीन जगाची, त्यातील अंतर्विरोधाची अंगावर आणि मनावर घोंघावत येणारी वादळं मी समर्थपणे पेलू शकतेय. माझा स्वतःवरचा विश्वास वाढवण्यास, माझ्या अनिर्बंध स्वप्नांना कवेत घेण्यास हे शब्दच मला प्रेरणा देत असतात. या शब्दांनीच मग कधी तरी माझी कवितेशी ओळख करून दिली, अशी प्रामाणिक कबुलीही ती देते आणि 'संभ्रमाच्या आवर्तात घुसमटत असताना, स्वतःच्या जाणिवांशी प्रामाणिक राहू बघताना आणि मनावरची, शरीरावरची बंधनं तोडू पाहताना याच कवितांनी मला बळ दिलंय' असं ती ठामपणे सांगते.

चित्रा मुद्‌गल यांनी संग्रहातील 'मधली उभी रेषा', 'मुखवटा', 'न्यूट्रल', 'रात गयी बात गयी' या कवितांना विशेष अधोरेखित केलंय. संग्रहातील प्रत्येकच कविता वाचनीय आहे. काव्यग्रह प्रकाशनाकडून 'अनावृत रेषा' हा प्रियांकाचा संग्रह प्रकाशित करताना मला आनंदच झाला होता. एका चांगल्या कवयित्रीची कविता आपण वाचकांसमोर नेतो आहोत याचा अभिमानही वाटत











# माझी कवितेतील भावाभिव्यक्ती सुरूच राहील...

## प्रियांका डहाळे

लहानपणापासून मला परीकथेत रमायची हौस होती. आपण जिथे जगतो आहोत त्याला समांतर असं दुसरं विश्व आहे, जे फक्त स्वप्नात भेटतं, असं काहीसं वाटायचं ते वय होतं. त्या वेळी कुठल्या माध्यमातून व्यक्त व्हायचं, कसं व्हायचं, काय व्यक्त करायचं, हे प्रश्न पडायचीही उमज नव्हती. भोवती वावरणाऱ्या समंजस लोकांच्या नजरेतून जाणती होत गेले, तशी आतल्या आत एक विलक्षण तडफड व्हायला लागली. सरळ, तर्कसुसंगत असं काही वाटेनासं झालं, सुचेनासं झालं त्या वेळी कविता सापडली. पहिली कविता रचली त्या वेळी मला स्वत:ला ठाऊक नव्हतं की शैलीला, फॉर्मला कविता म्हणतात. तोवर मला ललित लिहायची सवय लागली होती.

माझा 'अनावृत रेपा' हा कवितासंग्रह २०१२मध्ये प्रकाशित झाला, तोवर भवताली तऱ्हेतऱ्हेच्या कवींचे पीक (उदासीन उपहासाने ही उपमा एका विशिष्ट समुदायाने कवी या गटाला दिली आहे.) उगवलं होतं. कदाचित मीही याच गटातली असेन. सर्वत्र उपहास बघत असताना, अनुभवत असताना माणूसपणाच्याही काही सकारात्मक ऊर्जा देणाऱ्या नजरा माझ्या भोवती होत्या. काही अनुभव तितकेच अंतर्मुख करणारे होते. माझ्यासारख्या पण विविध स्तरांमध्ये जगणाऱ्या बायकांच्या दु:खाचे, आनंदाचे बहुविध पदर माझ्या पदवी-पदव्युत्तर शिक्षणाच्या प्रवासात मला हलवून सोडत होते. नेहमी वाटायचं, कुठली आयडियालॉजी घेऊन जगत आहोत आपण? आदर्शवादाला 'आयडियालॉजी' हा इंग्रजी शब्द देऊन चहाच्या टपरीवरून मार्केटच्या फेटरियात आलेल्या पिढीला आत्मकेंद्री जगाबाहेरचं काहीच कसं दिसत नाही? जे दिसतं ते फक्त स्वत:चं मन स्वत:पुरतं गदगदवून सोडण्यापुरतं.

ही जाणीव सतत छळत असूनही मला या पांढरपेशा चौकटीतून बाहेर पडता येत नाही. जरा बाहेर पडले की 'स्त्रीवादी'सारखे तत्सम शब्द लावले जातात. या शब्दांचा, या उपमांचा मला तिरस्कार नाही; पण बाईवर लिहिलं म्हणून माझी कविता स्त्रीवादी, असा सरधोपट समज माझा ना माझ्या कवितांच्या ना दुसऱ्यांच्या कवितांच्या संदर्भात. चौकट एकदा मोडली की दुसरी तयार होतेच. ती तयार झाली नाही तर कोलाज जमू शकलेलं काही तरी तुकड्या-तुकड शिल्लक उरतं. माझी चौकट तयार होत असताना मी काय ओलांडलं, काय स्वीकारलं, या दोन बाजूंच्या मधल्या जागेत ग्रेस, जी. ए. कुलकर्णी, अरुण कोलटकर, दि. पु. चित्रे, बा. सी. मर्ढेकर, अरुण काळे या मराठीतल्या कवींबरोबर एमिली ब्राँटसारख्या कवयित्री मला भावल्या. या सगळ्यांच्या कवितांचे संस्कार नाही पण इंप्रेशन्स माझ्या शब्दांमधल्या फटकाऱ्यांवर पडलीच; पण पत्रकारिता करत असताना बातमी नि लेखाच्या पलीकडचं जे काही मनात वृत्तपत्रीय साच्यात वसणारं पण संवेदना जपणारं असं उरतं, ते ते माझ्या कवितेत जागा घेतं. ते उरलेलं असतं म्हणून काही ते खरकट नसतं; त्याची स्वत:ची अशी

होता. प्रियांकाला कवयित्री म्हणून या संग्रहामुळे नाव मिळालं. या संग्रहाला मानाचे पुरस्कारही मिळालेत. या संग्रहाच्या निमित्ताने मी तिची मुलाखतही घेतली होती. ती आपल्यातून अचानक निघून जाण्याच्या एक दिवस आधी घेतलेली मुलाखत नंतर प्रकाशितही झाली, हा केवळ योगायोग होता. प्रियांका तिच्या कवितेविषयी भरभरून बोलली. दुसऱ्या कवितासंग्रहाविष विचारल्यावर ती म्हणाली, "अर्थात, या एका संग्रहापुरतं माझं लेखन वा माझी कविता थांबायची नाही. माझी कवितेतली भावाभिव्यक्ती ही सुरूच असणार आहे. कारण त्याशिवाय दुसरा कुठला प्रामाणिक फ माझ्या अगदी आतल्या भावनांना मोकळा हिंडू देणारा,





अनुक्रमणिका

स्वतंत्र जागा असते, जी कवितेत असते. प्रणय, शरीरसंबंधापासून भवतालच्या जगाकडे पाहण्याची माझी अशी स्वत:ची दृष्टी आहे. भवताली घडणाऱ्या घटनांना रिॲक्ट होण्याची माझी स्वत:ची एक पद्धत आहे, तऱ्हा आहे. वेंधळ्या-धसमुसळ्या जाणिवांमधून वाट काढत भवतालाला समजून घेण्याची नि या भवतालात सरव्हाइव होण्याची धडपड करत असताना कुठल्या तरी अगम्य क्षणी एखादं चित्र काढायला बसावं, तंद्री लागावी तशी मला कविता सुचते. अलीकडे स्केचेस काढायचा प्रयत्न करते आहे. एक कादंबरी लिहून दुसरी लिहायला घेतली आहे. कवितेचा फॉर्म मध्येच आताशा गवसतो त्यामुळे. पण महाविद्यालयीन जगतातल्या अल्लडपणातून नुकतंच बाहेर पडत असताना केलेल्या कवितांना काव्याग्रह प्रकाशनाने गोळा करीत 'अनावृत रेषा' हा कवितासंग्रह प्रकाशित केला त्या वेळी मला मीच नव्याने कळत गेले. या कवितासंग्रहात 'रेषा' या संकल्पनेला वेगवेगळ्या अर्थाने मी वापरलं आहे. रेषा परंपरांच्या असोत, विचारांच्या असोत, शरीराच्या असोत; त्यांच्यात एक लक्ष्मणरेषा कायम दडलेली असते. ही लक्ष्मणरेषा ओलांडण्याचा एक प्रांजळ प्रयत्न बंडखोरीच्या वयात या कवितांच्या माध्यमातून मीही करून पाहिला. माझ्यापुरते नि माझ्या कविता जाणतेपणाने वाचण्यापुरतं हे शब्दांमधलं, अभिव्यक्तीमधलं बंड वाखाणलंही गेलं. पण त्यापलीकडे एक स्वतंत्र विचारांचा, स्वतंत्र मनाचा, तथाकथित नियम (समाजाचे!) पाळू बघणारा एक बाईचा देह माणूस म्हणून जगू पाहतो आहे, एवढं जरी वाचणाऱ्याला समजलं तरी या कवितांचे यश मी समजायचं. हिंदी साहित्यातील प्रसिद्ध साहित्यिक चित्रा मुद्गल यांनी मोठ्या मनाने कवितासंग्रहास प्रस्तावना देऊन माझ्या कवितेला व्यापकतेचे परिमाण देण्याचा प्रयत्न केला.

*'मिणमिणत्या पणत्या*
*कधी तरी*
*जागवतात अर्धवट स्वप्नं*
*कधी जाग्याही करतात*
*अधुऱ्या राहिलेल्या*
*अनवट इच्छा*
*तेवढे काहीसे क्षण चेतवतात*
*शरीर आणि निद्रिस्त मनही.*
*वाटतं, तेवढंच जगून घ्यावं.*
*बेभान होत कुणाच्या*
*स्पर्शात घोळत*
*विजेसारखं सळसळून घ्यावं.*
*तो कोण, कुठला*
*विचारू ही नये.'*

चित्राताईंनी माझ्या 'रात गयी बात गयी' या कवितेतील या ओळींना उचलून धरत मी समकालीन पिढीचं या कवितांमध्ये चित्र उमटवू बघते आहे याची मला नव्याने जाणीव करून दिली. कधी कधी आपण आपल्या नकळत काही रेखाटत असतो, त्यातलं मर्म तेवढ्याच कलात्मकतेने बघणाऱ्या त्रयस्थाला कळत असतं. असाच काहीसा चित्राताईंच्या बाबतीत माझा अनुभव होता. अर्थात, या एका कवितासंग्रहापुरतं माझं लेखन वा माझी कविता थांबायची नाही. माझी कवितेतली भावाभिव्यक्ती ही सुरूच असणार आहे, कारण त्याशिवाय दुसरा कुठला प्रामाणिक फॉर्म माझ्या अगदी आतल्या भावनांना मोकळं हिंडू देणारा, ॲब्सर्डिटी सहन करणारा सध्या तरी मला गवसलेला नाही.

◆

शब्दांकन : विष्णू जोशी

*(हा लेख प्रियांकाचे निधन होण्याच्या काही दिवस आधीच विष्णू जोशी यांनी शब्दांकित केला होता. तो प्रियांकाच्या निधनानंतर दै. दिव्य मराठीच्या रविवारच्या पुरवणीत प्रसिद्ध झाला.)*

ॲब्सर्डिटी सहन करणारा सध्या तरी मला गवसलेला नाही.'' कवयित्री म्हणून प्रियांकाकडून खूप अपेक्षा वाढल्या होत्या. तिचं असं अवेळी निघून जाणं खूपच धक्कादायक आहे. एका चांगल्या कवयित्रीला आपण मुकलो आहोत. तिच्याच शब्दांत सांगायचं, तर मनातील कृष्णचिंतनात जन्मलेल्या या कवितांना असं उजेडात आणताना जशी तिच्या मनात थोडी हुरहूर होती, तसं तिच्या जाण्याने ती सर्वांनाच कायमची हुरहूर लावून गेली आहे.

◆

**विष्णू जोशी**
भ्रमणध्वनी : ९६२३१९३४८०
vishnujoshi80@gmail.com



लेख

मेधा सिधये

# ग्रेस यांच्या काव्यनिर्मितीचे विविधांगी विश्लेषण

**ज्येष्ठ कवी ग्रेस यांच्या काव्यनिर्मितीचा विविध अंगांनी वेध घेणारा डॉ. माधवी देसाई यांचा 'ग्रेस - कविता आणि स्त्रीप्रतिमा' हा ग्रंथ प्रकाशित झाला आहे. या ग्रंथावर भाष्य करणारा लेख.**

कवी ग्रेस (माणिक सीताराम गोड्घाटे) हे साठोत्तरी मराठी काव्यक्षेत्रातले एक महत्त्वाचे नाव. त्यांच्या कवितेने सर्वसाधारण मराठी काव्यास्वादकांवर मोहिनी घातली ती त्यांच्या शब्दकळेमुळे, नादमाधुर्यामुळे, विविध प्रकारच्या प्रतिमा-सृष्टीमुळे. ग्रेस वाचल्यानंतर कोणाही वाचकांच्या मनात काही तरी सौंदर्यपूर्ण आकृती निर्माण होतात; काही तरी हवेहवेसे वाटणारे पण गहनगूढ, धुक्याने वेढलेले, तरल भावसंवेदन जागे होते; कवितांमधील संगीताचा अंतःस्वर खुळावून टाकतो. वाचक ग्रेसचे चाहते होतात. पण एवढे सगळे असूनही ग्रेस समजले का, पूर्णपणे कळतात का, समजावून सांगता येतील का, या प्रश्नांची उत्तरे सर्वसाधारण वाचकांचीच नव्हे तर जाणकारांचीही बव्हंशी नकारात्मकच आहेत. सर्वसामान्य वाचक 'ग्रेस आवडतात पण सगळे कळत नाहीत' असे प्रामाणिकपणे म्हणतात. काही समीक्षकांचा अभिप्राय मौनात सामावलेला दिसतो. ते ग्रेसच्या समीक्षेच्या वाटेला गेलेच नाहीत. जे गेले त्यांनी सर्वांगीण समीक्षा केली नाही. अन्य काही लेखकांनी ग्रेस माझे किती जवळचे मित्र होते, 'I am free but not available' ही त्यांच्या दारावरची पाटी कशी माझ्यासाठी नव्हती, आमच्या कशा छान गप्पा होत असत इ. इ. व्यक्तिगत नातेसंबंधांविषयी जिव्हाळ्याने लिहिले, पण त्यांचे काव्य, ललित गद्य यांचा साक्षेपाने, मूलभूत अभ्यास मांडला नाही. कदाचित प्रेमादरापोटी त्यांना तशी गरज वाटली नसेल. लोकप्रिय कलावंतांशी (अन्य साऱ्या गोष्टी बाजूला ठेवून) मैत्रभाव जोडणारा एक चाहतावर्ग असतोच. कलावंतांचीसुद्धा ती मानसिक गरज असते.




डॉ. माधवी देसाई यांनी त्यांच्या 'ग्रेस - कविता आणि स्त्रीप्रतिमा' या ग्रंथात ग्रेस यांच्या कवितेची सहा प्रकारांनी समीक्षा झालेली दिसते असे म्हणून ते प्रकार सांगितले आहेत :

१) साहित्यशरणतेने केलेली समीक्षा- उदा. जयंत परांजपे, अक्षयकुमार काळे, वीणा आलासे, नंदकुमार मुलमुले

२) ग्रेस यांच्या प्रारंभीच्या काव्यलेखनाच्या काळात साहित्यिक प्रोत्साहन देण्यासाठी व त्यांच्या उभारीच्या काळात सहानुभूतीने प्रोत्साहन देण्यासाठी केलेली समीक्षा- उदा. डॉ. द. भि. कुलकर्णी

३) ग्रेस यांच्या अस्सल कविता विचारात घेऊन केलेली समीक्षा- उदा. म. सु. पाटील

४) ग्रेस यांच्या कवितेची साक्षेपी समीक्षा- उदा. त्र्यं. वि. सरदेशमुख

५) ग्रेस यांच्या नादमय, संगीताकर्षी कवितांवर लुब्ध होऊन



अनुक्रमणिका






त्या कवितांचे केलेले लेखी व तोंडी विवेचन- उदा. लता मंगेशकर, हृदयनाथ मंगेशकर, आनंद मोडक

६) ग्रेस यांच्या कवितेबाबत पूर्ण मौन घेतलेले समीक्षक- भालचंद्र नेमाडे, माधव आचवल, माधव गाडगीळ, दि. पु. चित्रे

(खरे म्हणजे हा मुद्दा वेगळा आहे. तो ग्रेस यांच्या कवितेची समीक्षा या प्रकारात कसा बसतो? यांनी समीक्षा केलेलीच नाही.)

७) संकीर्ण

ग्रेसच्या समीक्षेच्या या पार्श्वभूमीवर त्यांच्या कवितेची साठी उलट त्यावर का होईना, वस्तुनिष्ठ तेने, तटस्थपणे पण सहृदयतेने सर्वांगीण अभ्यासपूर्ण समीक्षा होणे ही स्वागतार्ह गोष्ट आहे. ग्रेसची जनमानसावरील मोहिनी आणि समीक्षकांपुढे त्यांच्या कवितेने उभे केलेले आव्हान, निर्माण केलेले चक्वे, स्वतःविषयी व स्वतःच्या कवितेविषयी केलेली विधाने यांमुळे ग्रेसच्या कवितेच्या यथातथ्य दर्शनासाठी अशा साधार, परखड समीक्षेची गरज होती. डॉ. माधवी देसाई यांच्या ग्रंथाने हे काम चोख केले आहे. ग्रंथाचे शीर्षक मात्र ग्रंथाची व्याप्ती मर्यादित करणारे आहे. यात केवळ ग्रेसच्या कवितांतील स्त्रीप्रतिमा एवढाच विषय नाही.

ग्रंथात विषयप्रवेशासहित एकूण पाच प्रकरणे आहेत-

१) विषयप्रवेश

२) ग्रेस : व्यक्तित्त्व आणि कवित्व

३) ग्रेस : कविता आणि काव्यजाणिवा

४) ग्रेस यांच्या कवितेतील स्त्रीप्रतिमा

५) ग्रेस यांच्या कवितेची समीक्षा

या ग्रंथाला समीक्षक रवींद्र ठाकूर यांची प्रस्तावना आहे. तिचा आशय असा- ग्रेस यांची कविता आदिम अनुभवांचं संचित घेऊन आलेली. ही कविता लोकप्रिय, पण समजतेच असं नाही. ग्रेस यांची कविता आणि लौकिक व्यक्तिमत्त्व याभोवती एकगूढवलय. कारण कवीचे भावविश्व गुंतागुंतीचे- जटिल. ग्रेसच्या आकलनासाठी सी. जी. युंगची सामूहिक निश्चेतनाची (collective unconscious)ची संकल्पना उपयोगी पडू शकते. ग्रेस हे समीक्षकांपुढचे आव्हान आहे. या ग्रंथात त्यांच्या आकलनदुर्लभ आणि दुःखमग्न कवितेचा शोध घेण्याचा प्रयत्न आहे.

विषयप्रवेश या पहिल्या प्रकरणात लेखिकेने आपल्या ग्रंथातील प्रतिपाद्य आणि निष्कर्ष थोडक्यात सांगितले आहेत. या विवेचनात चंद्रकांत पाटील, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. व्यं. केतकर, वि. वा. शिरवाडकर यांच्या लेखनाचे उल्लेख येतात, पण त्यांचे संदर्भ लेखिकेने दिलेले नाहीत. ते देणे आवश्यक होते.

पुढील प्रकरणात ग्रेसच्या व्यक्तिगत जीवनाचा प्रथम आढावा घेतला आहे. चरित्रात्मक समीक्षा लेखिकेला फारशी आवडत नाही, तरी काही वेळा ती कलावंताला समजून घ्यायला उपयोगी पडते. विशेषतः वैयक्तिक जीवनानुभवच जर एखाद्याच्या कलानिर्मितीच्या केंद्रस्थानी असेल- अगदी प्रारंभापासून अखेरपर्यंत, आणि त्याच्यातून तो कलावंत बाहेर पडून व्यापक, विशाल जाणिवेपर्यंत पोहोचूच शकत नसेल तर त्याचे मूळ त्याच्या व्यक्तिगत चरित्रात, वास्तवातील त्याच्या जीवनानुभवात शोधावे लागते. या अनुभवांचा त्याच्या व्यक्तिमत्त्वावर, कलेच्या आशयाभिव्यक्तीवर अमीट ठसा असतो. ग्रेस यांचे अहंकारी व आत्मकेंद्री व्यक्तिमत्त्व, त्यांच्या कवितेतील दुःखजाणीव, 'आई' ही त्यांच्या कवितेतील प्रतिमा यांचा सूक्ष्म अभ्यास म्हणजेच प्रामुख्याने ग्रेसचा अभ्यास असे म्हटल्यास ते वावगे ठरू नये. त्यामुळे लेखिकेला ग्रेसच्या बालपणापासूनचा तपशील लक्षात घेणे, चरित्रात्मक समीक्षेचा काही प्रमाणात अवलंब करणे अपरिहार्य होते. ग्रेसच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि कवित्वाचा अनुबंध दुसऱ्या प्रकरणात उलगडून दाखविला आहे.

पुढील प्रकरणात ग्रेसच्या काव्यजाणिवांविषयी लिहिताना त्यांच्या प्रत्येक काव्यसंग्रहाचा परामर्श घेतला आहे. सोदाहरण विवेचन केले आहे. ग्रेसच्या काव्यजाणिवांमध्ये मृत्यूची भीती, निर्मितिविनाशभय, स्मृतिउदासी, दुःखजाणीव, करुणार्तता, स्त्रीविषयक जाणिवा, मातृजाणीव इ.चा समावेश होतो. 'आई' ही प्रतिमा ग्रेसच्या कवितेत वात्सल्यमूर्ती, सृजनाचे प्रतीक अशा पारंपरिक स्वरूपात न येता ती 'स्त्री'तून निर्माण होणाऱ्या सर्व नात्यांची प्रतिनिधी म्हणून येते. 'आई' ही कवीची आई, मैत्रीण, प्रेयसी सर्व काही आहे. तिच्याविषयी वात्सल्ययुक्त ओढ, चीड, द्वेष, प्रेम, करुणा अशा परस्परविरोधी भावना कवितेतून व्यक्त झाल्या आहेत. भावजीवनातील असंख्य गुंते काव्याविष्कारात प्रगटतात. ग्रेसची कविता सौंदर्यपूर्णतेने नटून, निसर्गाचे बोट धरून, देखण्या- लावण्यमय शब्दसंभारासहित लयकारीने रसिकांपुढे येते. दुःख बाह्यांगाने देखणे होते आणि गारुड करते. ग्रेसच्या कवितेला जी दुःखजाणीव व्यापून राहिली आहे. तिचे स्वरूप काय आहे? तर -

१) कवीला मातृप्रेम मिळाले नाही.

२) पित्याचे नाव आईकडून शेवटपर्यंत कळले नाही म्हणून तो दुःखी आहे. आपल्या वंशहीनतेची जाणीव त्याने



लेख

मेधा सिधये

# ग्रेस यांच्या काव्यनिर्मितीचे विविधांगी विश्लेषण

**ज्येष्ठ कवी ग्रेस यांच्या काव्यनिर्मितीचा विविध अंगांनी वेध घेणारा डॉ. माधवी देसाई यांचा 'ग्रेस - कविता आणि स्त्रीप्रतिमा' हा ग्रंथ प्रकाशित झाला आहे. या ग्रंथावर भाष्य करणारा लेख.**

कवी ग्रेस (माणिक सीताराम गोड्याटे) हे साठोत्तरी मराठी काव्यक्षेत्रातले एक महत्त्वाचे नाव. त्यांच्या कवितेने सर्वसाधारण मराठी काव्यास्वादकांवर मोहिनी घातली ती त्यांच्या शब्दकळेमुळे, नादमाधुर्यामुळे, विविध प्रकारच्या प्रतिमा-सृष्टीमुळे. ग्रेस वाचल्यानंतर कोणाही वाचकांच्या मनात काही तरी सौंदर्यपूर्ण आकृती निर्माण होतात; काही तरी हवेहवेसे वाटणारे पण गहनगूढ, धुक्याने वेढलेले, तरल भावसंवेदन जागे होते; कवितांमधील संगीताचा अंतःस्वर खुळावून टाकतो. वाचक ग्रेसचे चाहते होतात. पण एवढे सगळे असूनही ग्रेस समजले का, पूर्णपणे कळतात का, समजावून सांगता येतील का, या प्रश्नांची उत्तरे सर्वसाधारण वाचकांचीच नव्हे तर जाणकारांचीही बव्हंशी नकारात्मकच आहेत. सर्वसामान्य वाचक 'ग्रेस आवडतात पण सगळे कळत नाहीत' असे प्रामाणिकपणे म्हणतात. काही समीक्षकांचा अभिप्राय मौनात सामावलेला दिसतो. ते ग्रेसच्या समीक्षेच्या वाटेला गेलेच नाहीत. जे गेले त्यांनी सर्वांगीण समीक्षा केली नाही. अन्य काही लेखकांनी ग्रेस माझे किती जवळचे मित्र होते, 'I am free but not available' ही त्यांच्या दारावरची पाटी कशी माझ्यासाठी नव्हती, आमच्या कशा छान गप्पा होत असत इ. इ. व्यक्तिगत नातेसंबंधांविषयी जिव्हाळ्याने लिहिले, पण त्यांचे काव्य, ललित गद्य यांचा साक्षेपाने, मूलभूत अभ्यास मांडला नाही. कदाचित प्रेमादरापोटी त्यांना तशी गरज वाटली नसेल. लोकप्रिय कलावंतांशी (अन्य साऱ्या गोष्टी बाजूला ठेवून) मैत्रभाव जोडणारा एक चाहतावर्ग असतोच. कलावंतांचीसुद्धा ती मानसिक गरज असते.



डॉ. माधवी देसाई यांनी त्यांच्या 'ग्रेस - कविता आणि स्त्रीप्रतिमा' या ग्रंथात ग्रेस यांच्या कवितेची सहा प्रकारांनी समीक्षा झालेली दिसते असे म्हणून ते प्रकार सांगितले आहेत :

१) साहित्यशरणतेने केलेली समीक्षा- उदा. जयंत परांजपे, अक्षयकुमार काळे, वीणा आलासे, नंदकुमार मुलमुले

२) ग्रेस यांच्या प्रारंभीच्या काव्यलेखनाच्या काळात साहित्यिक प्रोत्साहन देण्यासाठी व त्यांच्या उभारीच्या काळात सहानुभूतीने प्रोत्साहन देण्यासाठी केलेली समीक्षा- उदा. डॉ. द. भि. कुलकर्णी

३) ग्रेस यांच्या अस्सल कविता विचारात घेऊन केलेली समीक्षा- उदा. म. सु. पाटील

४) ग्रेस यांच्या कवितेची साक्षेपी समीक्षा- उदा. त्र्यं. वि. सरदेशमुख

५) ग्रेस यांच्या नादमय, संगीतात्म कवितांवर लुब्ध होऊन

त्या कवितांचे केलेले लेखी व तोंडी विवेचन- उदा. लता मंगेशकर, हृदयनाथ मंगेशकर, आनंद मोडक

६) ग्रेस यांच्या कवितेबाबत पूर्ण मौन घेतलेले समीक्षक- भालचंद्र नेमाडे, माधव आचवल, माधव गाडगीळ, दि. पु. चित्रे

(खरे म्हणजे हा मुद्दा वेगळा आहे. तो ग्रेस यांच्या कवितेची समीक्षा या प्रकारात कसा बसतो? यांनी समीक्षा केलेलीच नाही.)

७) संकीर्ण

ग्रेसच्या समीक्षेच्या या पार्श्वभूमीवर त्यांच्या कवितेची साठ ी उलट ल्यावर क ा होईना, वस्तुनिष्ठ तेने, तट स्थपणे पण सहृदयतेने सर्वांगीण अभ्यासपूर्ण समीक्षा होणे ही स्वागतार्ह गोष्ट आहे. ग्रेसची जनमानसावरील मोहिनी आणि समीक्षकांपुढे त्यांच्या कवितेने उभे केलेले आव्हान, निर्माण केलेले चक्वे, स्वतःविषयी व स्वतःच्या कवितेविषयी केलेली विधाने यांमुळे ग्रेसच्या कवितेच्या यथातथ्य दर्शनासाठी अशा साधार, परखड समीक्षेची गरज होती. डॉ. माधवी देसाई यांच्या ग्रंथाने हे काम चोख केले आहे. ग्रंथाचे शीर्षक मात्र ग्रंथाची व्याप्ती मर्यादित करणारे आहे. यात केवळ ग्रेसच्या कवितांतील स्त्रीप्रतिमा एवढाच विषय नाही.

ग्रंथात विषयप्रवेशासहित एकूण पाच प्रकरणे आहेत-

१) विषयप्रवेश

२) ग्रेस : व्यक्तित्त्व आणि कवित्व

३) ग्रेस : कविता आणि काव्यजाणिवा

४) ग्रेस यांच्या कवितेतील स्त्रीप्रतिमा

५) ग्रेस यांच्या कवितेची समीक्षा

या ग्रंथाला समीक्षक रवींद्र ठाकूर यांची प्रस्तावना आहे. तिचा आशय असा- ग्रेस यांची कविता आदिम अनुभवांचं संचित घेऊन आलेली. ही कविता लोकप्रिय, पण समजतेच असं नाही. ग्रेस यांची कविता आणि लौकिक व्यक्तिमत्त्व याभोवती एकगूढवलय. कारण कवीचे भावविश्व गुंतागुंतीचे- जटिल. ग्रेसच्या आकलनासाठी सी. जी. युंगची सामूहिक निश्चेतनाची (collective unconscious)ची संकल्पना उपयोगी पडू शकते. ग्रेस हे समीक्षकांपुढचे आव्हान आहे. या ग्रंथात त्यांच्या आकलनदुर्लभ आणि दुःखमग्न कवितेचा शोध घेण्याचा प्रयत्न आहे.

विषयप्रवेश या पहिल्या प्रकरणात लेखिकेने आपल्या ग्रंथातील प्रतिपाद्य आणि निष्कर्ष थोडक्यात सांगितले आहेत. या विवेचनात चंद्रकांत पाटील, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. व्यं. केतकर, वि. वा. शिरवाडकर यांच्या लेखनाचे उल्लेख येतात, पण त्यांचे संदर्भ लेखिकेने दिलेले नाहीत. ते देणे आवश्यक होते.

पुढील प्रकरणात ग्रेसच्या व्यक्तिगत जीवनाचा प्रथम आढावा घेतला आहे. चरित्रात्मक समीक्षा लेखिकेला फारशी आवडत नाही, तरी काही वेळा ती कलावंताला समजून घ्यायला उपयोगी पडते. विशेषतः वैयक्तिक जीवनानुभवच जर एखाद्याच्या कलानिर्मितीच्या केंद्रस्थानी असेल- अगदी प्रारंभापासून अखेरपर्यंत, आणि त्याच्यातून तो कलावंत बाहेर पडून व्यापक, विशाल जाणिवेपर्यंत पोहोचूच शकत नसेल तर त्याचे मूळ त्याच्या व्यक्तिगत चरित्रात, वास्तवातील त्याच्या जीवनानुभवात शोधावे लागते. या अनुभवांचा त्याच्या व्यक्तिमत्त्वावर, कलेच्या आशयाभिव्यक्तीवर अमीट ठसा असतो. ग्रेस यांचे अहंकारी व आत्मकेंद्री व्यक्तिमत्त्व, त्यांच्या कवितेतील दुःखजाणीव, 'आई' ही त्यांच्या कवितेतील प्रतिमा यांचा सूक्ष्म अभ्यास म्हणजेच प्रामुख्याने ग्रेसचा अभ्यास असे म्हटल्यास ते वावगे ठरू नये. त्यामुळे लेखिकेला ग्रेसच्या बालपणापासूनचा तपशील लक्षात घेणे, चरित्रात्मक समीक्षेचा काही प्रमाणात अवलंब करणे अपरिहार्य होते. ग्रेसच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि कवित्वाचा अनुबंध दुसऱ्या प्रकरणात उलगडून दाखविला आहे.

पुढील प्रकरणात ग्रेसच्या काव्यजाणिवांविषयी लिहिताना त्यांच्या प्रत्येक काव्यसंग्रहाचा परामर्श घेतला आहे. सोदाहरण विवेचन केले आहे. ग्रेसच्या काव्यजाणिवांमध्ये मृत्यूची भीती, निर्मितिविनाशभय, स्मृतिउदासी, दुःखजाणीव, करुणार्तता, स्त्रीविषयक जाणिवा, मातृजाणीव इ.चा समावेश होतो. 'आई' ही प्रतिमा ग्रेसच्या कवितेत वात्सल्यमूर्ती, सृजनाचे प्रतीक अशा पारंपरिक स्वरूपात न येता ती 'स्त्री'तून निर्माण होणाऱ्या सर्व नात्यांची प्रतिनिधी म्हणून येते. 'आई' ही कवीची आई, मैत्रीण, प्रेयसी सर्व काही आहे. तिच्याविषयी वात्सल्ययुक्त ओढ, चीड, द्वेष, प्रेम, करुणा अशा परस्परविरोधी भावना कवितेतून व्यक्त झाल्या आहेत. भावजीवनातील असंख्य गुंते काव्याविष्कारात प्रगट तात. ग्रेसची कविता सौंदर्यपूर्णतेने नटून, निसर्गाचे बोट धरून, देखण्या- लावण्यमय शब्दसंभारासहित लयकारीने रसिकांपुढे येते. दुःख बाह्यांगाने देखणे होते आणि गारुड करते. ग्रेसच्या कवितेला जी दुःखजाणीव व्यापून राहिली आहे, तिचे स्वरूप काय आहे? तर -

१) कवीला मातृप्रेम मिळाले नाही.

२) पित्याचे नाव आईकडून शेवटपर्यंत कळले नाही म्हणून तो दुःखी आहे. आपल्या वंशहीनतेची जाणीव त्याने

हृदय पोखरते.

३) कवीच्या वाट्याला एकाकीपण आले. बाल्य करपून गेले.

ग्रेसच्या आईविषयक कवितांतून या आईविषयक जाणिवा व्यक्त होतात. वात्सल्यभावाबरोबर शृंगारसूचन, कामभाव आणि आईचे 'स्त्री' असणे व्यक्त होते.

ग्रेस स्वतःला 'दुःखाचा महाकवी' म्हणवितात.

'मी महाकवी दुःखाचा
प्राचीन नदीपरि खोल
दगडाचे माझ्या हाती
वेगाने होते फूल'

या संदर्भात लेखिका म्हणते- 'हे 'दुःखाचे' कवी किंवा 'दुःखी' कवी आहेत, परंतु 'महाकवी' असणे संभवत नाही; कारण 'महाकवी' हा एकाच जाणिवेवर किंवा संवेदनेवर कधीच महाकाव्य लिहीत नाही. महाकवीला मानवी जीवनातील, अखिल विश्वातील सर्वच्या सर्व संवेदनांचे, जाणिवांचे अप्रूप असते. कोणत्याही भाषेतील 'महाकवी'ने एकाच एका संवेदनेवर महाकाव्य लिहिले नाही. कारण ते महाकाव्याचे लक्षणही नाही.' (पृ. ३०)

'हे महाप्रचंड, अमर्याद ब्रह्मांड व्यापणारे असे कोणते 'महादुःख' आहे; त्याचे कारण, त्याची प्रत, त्याचे 'निदान' ग्रेस आपल्या कवितेत कुठेही स्पष्ट करत नाहीत. त्यांच्या कवितेतून मातृवियोग, निर्मितिनाशाचे भय, अंधाराचे भय व्यक्त होते; पण त्या दुःखाचे अटळपण ग्रेस यांना जाणवलेले नाही किंवा उमगत नाही असे म्हणणे चूक ठरेल. अटळ दुःखाला सोसावेच लागते, हेही 'अटळपण' त्यांना ज्ञात आहेच. मग पुनःपुन्हा दुःखाचेच वर्णन करून ग्रेस कवितानिर्मितीतून काय साधतात, असा प्रश्न निर्माण झाल्यास नवल नाही.' (पृ. ८७-८८)

जिथे 'स्व'चा परीघ छेदून कवी दुःखाविषयी लिहितो तेथे 'सोलीव दुःखाचे' चिंतन दिसते. याचे उदाहरण-

'क्षितिज जसे दिसते
तशी म्हणावी गाणी
देहावरची त्वचा आंधळी
छिलून घ्यावी कोणी
गाय जशी हंबरते
तसेच व्याकुळ व्हावे
बुडता बुडता सांजप्रवाही
अलगद भरुनि यावे'

नवनिर्मितीचा आनंद उपभोगण्यासाठी दुःख भोगावे लागतेच. येथे वैयक्तिक दुःखाला क्षितिजाच्या पातळीवर नेले आहे.

ग्रेस यांच्या स्त्रीप्रतिमांविषयी विवेचन करताना ग्रेस स्वतःला अनुवंशहीन म्हणवून घेतात, त्या संदर्भात 'आरसा' कवितेचे लेखिकेने केलेले विश्लेषण महत्त्वाचे आहे. (पृ. १०७ व १०८) 'आई' या प्रतिमेखेरीज कुंती, राधा, द्रौपदी, गांधारी इ. पौराणिक प्रतिमा; इन्ग्रिड बर्गमन, मेरिलिन मन्रो या प्रतिमा; 'बाऊल' या उपासनापंथाशी संबंधित 'वैष्णवी' ही प्रतिमा (या उपासनापंथाविषयीची माहिती लेखिकेने दिली आहे.); निळी परी, बहरव्याकुळा, चंद्रगौरी, चित्रवंदिनी इ. काल्पनिक स्त्रीप्रतिमा; 'अभिचार जगातील' काव्य दुनियेतील सटवी, हडळ, कैदाशिणी इ. प्रतिमा, अश्या विविध प्रतिमांचा विचार व्यक्त करून यापैकी फारच थोड्या प्रतिमा अर्थसंपृक्त झाल्या आहेत, असे मत व्यक्त केले आहे. ग्रेसच्या काव्यजाणिवा, भावजाणिवा आणि स्त्रीप्रतिमा हे विषय तसे परस्परसंलग्न आहेत. त्यांचे विस्तृत, सूक्ष्म विश्लेषण केले आहे. 'ग्रेस यांची वर्णनशैली ही त्यांच्या कवितेचा आत्मा आहे आणि शब्दांचे लावण्य हा कवितेचा प्राण आहे,' (पृ. ७६) असे लेखिका म्हणते ते पटणारेच आहे; पण या विधानाचा बारकाईने विचार केल्यावर लक्षात येते, की वर्णनशैली आणि शब्दलावण्य हे कलेचे बहिरंग आहे. त्याची महत्ता आशयघनतेशी संलग्न असते, असायला हवी. म्हणून हे विधान ग्रेसची गुणवत्ता व्यक्त करणारे नसून मर्यादा दाखविणारे आहे. आशय क्षीण होऊ लागला की कवी स्वतःचेच अनुकरण करू लागतो. 'हे अनुकरण म्हणजे प्रतिभा क्षीण झाल्याचे किंवा खुरटल्याचे लक्षण आहे,' (पृ. ७३) असे म्हणून लेखिकेने 'वाई जोगिया पुरुष' या काव्यसंग्रहातील 'व्याप' व 'कडा' या दोन कवितांचे उदाहरण दिले आहे. 'व्याप' कवितेच्या पहिल्या सहा ओळी आणि 'कडा'च्या पहिल्या पाच ओळी वेगळ्या आहेत. बाकी दोन्ही कवितांत काही फरक नाही. 'व्याप'मधल्या नऊ ओळी जशाच्या तशा 'कडा'मध्ये घेतलेल्या आहेत. अभ्यासविषयातील सूक्ष्मता; प्रत्येक विधान साधार, ठोसपणे करणे, जे चांगले आहे त्याचा गौरव करून पोकळपणा स्पष्टपणे व्यक्त करणे हे निर्भीड समीक्षकाचे गुण डॉ. माधवी देसाई यांच्या लेखनात दिसतात.

'ग्रेस यांच्या कवितेची समीक्षा' या शेवटच्या प्रकरणात हा समीक्षाविचार ज्या मुद्द्यांच्या अनुषंगाने करावयाचा आहे ते मुद्दे सांगितले आहेत-

१) ग्रेस यांच्या कवितेतील प्रभाव
२) ग्रेस यांच्या कवितेची तथाकथित अनुवंशहीनता
३) ग्रेस यांची निर्मितिप्रक्रिया आणि प्रश्नचूर शैली
४) ग्रेस यांच्या कवितेतील दुःखजाणीव
५) ग्रेस यांच्या कवितेतील वाङ्मयीन वृत्ती
६) ग्रेस यांच्या कवितेचे अनुकरण
७) ग्रेस यांच्या कवितेतील स्त्रीवाद आणि ग्रेस यांचा

स्त्रीविपयक दृष्टिकोन

८) ग्रेस यांची कविता आणि देशीयता इ.

या मुद्द्यांच्या आधारे विवेचन करताना अन्य समीक्षकांनी म्हणजे त्र्यं. वि. सरदेशमुख, रा. ग. जाधव, द. भि. कुलकर्णी, म. सु. पाटील, डॉ. चंद्रकुमार मुलमुले इत्यादींनी ग्रेसविषयी जे लिहिले आहे त्याचा परामर्श घेतला आहे. त्यांची जी मते योग्य वाटतात, पटतात, ती का पटतात ते सांगितले आहे. तसेच जी पटत नाहीत त्यांचे खंडन केले आहे. या संपूर्ण लेखनात जी अनाग्रही, संयमी, सदभिरुचिसंपन्न दृष्टी आढळते, तिचे स्वागतच करायला हवे. ग्रेससारख्या साहित्यक्षेत्रात दवदवा निर्माण केलेल्या कवीविपयी लिहिताना आणि अन्य समीक्षकांची काही मते खोडून काढताना लेखिका कुठेही आक्रस्ताळेपणाने, दवक्त लिहीत नाही. अभ्यासातून आलेला आत्मविश्वास आणि आस्था यांमुळे हे लेखन भरीव, विचारप्रवर्तक झाले आहे.

• ग्रेस-कविता आणि स्त्रीप्रतिमा
• डॉ. माधवी देसाई
• अक्षरदालन प्रकाशन

ग्रेसची कविता कालजयी आहे का, ग्रेस अनुवंशहीन कवी आहेत का, त्यांच्या कवितेने 'नव्य' दिले का, ते 'दुःखाचा महाकवी' आहेत का, या सर्व प्रश्नांची लेखिकेने दिलेली उत्तरे नकारात्मक आहेत.

ग्रेसच्या काही अस्सल चांगल्या कवितांचे विवेचन लेखिकेने केलेले आहे. त्यात 'वाग', 'कळशी' (हीच सामाजिकतेला स्पर्श करणारी एकमेव कविता), 'विठू', 'कवितेचे येणे : १', 'दुःख' इ. कवितांचा अंतर्भाव आहे. ग्रेस यांच्या ललित गद्य लेखनातील काही विधानांचाही परामर्श लेखिकेने घेतला आहे. उदा. कुसुमाग्रजांच्या 'पुतळे' या कवितेवरील ग्रेसची प्रतिक्रिया. ग्रेसच्या मुलाखतीतील विधानाविषयीही लिहिले आहे. ते म्हणतात, 'मी डुक्कर म्हणून जन्माला येईन, पण तेही ज्या महाराष्ट्रात ग्रेसची खरी किंमत नाही तेथे नाही' (पृ. १९६). (मूळ संदर्भ- ग्रेस : म. टा. संवाद पुरवणी ३० मे २०१०, पृ. २, प्रमोद भागवत यांनी ग्रेस यांची घेतलेली मुलाखत- 'संध्यामग्न पुरुष') ह्या ग्रेसच्या विधानासंदर्भात लेखिका म्हणते, 'ग्रेस यांच्या वक्तव्यातून महाराष्ट्राबद्दल प्रेम-अभिमान दिसत नाहीच, उलट महाराष्ट्राच्या रसिकतेचा, गुणग्राहकतेचा अपमान आहे' (पृ. १९६). ज्या महाराष्ट्राने ग्रेसना आठ-नऊ पुरस्कार दिले त्या महाराष्ट्राबद्दलचे हे उद्गार दुर्दैवी आणि संतापजनक आहेत. ग्रेसच्या कवितेच्या समीक्षासंदर्भात या उद्गारांचा अन्वय त्यांच्या व्यक्तिमत्त्वाशी आणि पर्यायाने त्यांच्या कवितेशी आहे. 'संध्याकाळच्या कविता'मधील 'स्वप्न' या कवितेत तुकाराम महाराजांच्या अभंगावद्दल ग्रेसने लिहिले आहे-

'प्राणांचे मोल देऊन मुक्ती विकत घेत
असतो मी; देहूच्या बाजारात अभंग
विकणाऱ्या तुकारामांप्रमाणे'

डॉ. माधवी देसाई लिहितात- 'देहूच्या बाजारात अभंग विकणाऱ्या तुकारामाप्रमाणे' या ओळी मात्र असह्य होतात. कारण तुकारामांच्या अभंगनिर्मितीची प्रेरणा व हेतू 'देहूच्या बाजारात अभंग विकणे' ही कधीच नव्हती... ग्रेस यांचे तुकारामांबद्दलचे विधान धाडसाचे, चुकीचे आणि अनुदाराचे आहे. त्याचा केव्हाही निषेधच होणे स्वाभाविक आहे.' (पृ. १६७-१६८)

ग्रेस यांची प्रश्नचूर शैली, त्यांच्या कवितेतील दुर्बोधता, स्त्रीवाद, स्त्रीविषयक दृष्टिकोन अशा अनेक मुद्द्यांची यथायोग्य चर्चा त्यांनी या ग्रंथात केली आहे. लेखिकेने एकूण ग्रंथात आपला निष्कर्ष व्यक्त केला आहे तो असा-

ग्रेस यांची शब्दप्रधान कविता नादानुसंधान साधते तेव्हा रसिकांना तिची भुरळ पडते. नादमधुर शब्दांच्या लयबद्धतेत रसिक मंत्रमुग्ध होतो आणि मग तो त्या भरात कवितेतील अर्थाची शोधाशोध करण्याच्या फंदात पडत नाही. ग्रेस यांच्या कवितेत भावनानिष्ठ आणि संवेदनानिष्ठ तादात्म्य आहे, पण तिच्यात ज्ञानात्मकता, वैचारिकता, विश्वात्मकता व मूल्यभाव नाही. अशाच कविता संख्येने अधिक आहेत. ग्रेस यांच्याकडे साहित्यविषयक, जीवनविपयक निश्चित, सार्वत्रिक भूमिका नाही. त्यांनी मराठी कवितेत एक वेगळा रामँटिसिझम आणला, वेगळी प्रतिमासृष्टी निर्माण केली. अभिजात शब्दकळेतून व्यामिश्र, जटिल, संदिग्ध अनुभूती व्यक्त केली. आशयापेक्षा अभिव्यक्तीला आणि नादमय शब्दकळेला कमालीचे महत्त्व दिले. ते अतिवास्तववादी संप्रदायातील कवी आहेत. ग्रेस यांच्या ज्या गुणात्मक, दर्जेदार कविता आहेत त्यांबद्दल ग्रेस यांच्यातील प्रतिभावंत कवित्वाचा सन्मान केला पाहिजे.

'मसाप'चा प्रा. रा. श्री. जोग समीक्षा पुरस्काराचा सन्मान (२०१५) प्राप्त झालेला प्रस्तुत ग्रंथ सर्वांगीण अभ्यासाचा वस्तुपाठच आहे. अक्षरदालन प्रकाशनाने (कोल्हापूर) ग्रंथनिर्मिती चांगली केली आहे. काही थोडे मुद्रणदोष आणि पुस्तकबांधणीतील दोष पुढील आवृत्तीत राहू नयेत ही अपेक्षा. लेखिका व प्रकाशक दोघांचेही मनःपूर्वक अभिनंदन!

◆

डॉ. मेधा सिधये
भ्रमणध्वनी : ९८८१००१९३१

वाचक आणि प्रकाशक यांचं नातं अतूट असतं. वाचनसंस्कृती वाढवण्याची आणि ग्रंथप्रसाराची मोठी जबाबदारी साहित्य व्यवहारातल्या या दोन महत्त्वाच्या घटकांवर अवलंबून असते. अनेक प्रकाशक चांगल्या व गांभीर्याने वाचन करणाऱ्या वाचकांसाठी अनेक प्रकल्प हाती घेऊन साहित्याचं दालन समृद्ध करत असतात.

अशाच काही मराठी प्रकाशन संस्थांचा आणि त्यांच्या विविध प्रकल्पांचा परिचय 'प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प' या सदरातून देत आहोत.

या अंकात 'शब्द' या प्रकाशन संस्थेच्या प्रवासाविषयी, भूमिकेविषयी तसेच त्यांच्या विविध प्रकल्पांविषयी 'शब्द'चे येशू पाटील यांच्याशी प्रा. सुजाता शेणई यांनी साधलेला संवाद.

■■

# निर्भय विचारांना पंख आणि निखळ निर्मितीला आकाश देणारं

# शब्द पब्लिकेशन






शब्द- द बुक गॅलरी', 'शब्द दीपोत्सव', 'शब गप्पा', 'शब्द पब्लिकेशन', 'शब्द पुरस्कार', आणि 'मुक्त शब्द मासिक' असे विविध उपक्रम समर्थपणे राबवणारी 'शब्द पब्लिकेशन' ही मुंबईतील प्रकाशन संस्थ आहे. साहित्यात शब्दांना असलेलं महत्त्व आणि या शब्दांतून होणारा साहित्य व्यवहार मानवी जीवनावर फार मोठा परिणाम घडवत असतो; म्हणून शब्दांची जाण असणे ही मूलभू गरज आहे. यामागे गांभीर्य आणि विचारशीलता हवी. ही उद्दिष्टं स्वीकारून त्या दिशेने 'शब्द पब्लिकेशन'चे येशू पाटील प्रयत्नशील आहेत. यशोधन पाटील म्हटलं तर चटकन लक्षात येणार नाही, कारण येशू पाटील हेच नाव आता परिचि झालं आहे. या परिचित नावाच्या मागे परिश्रमांची आणि उपक्रमांची फार मोठी झेप आहे. ही झेप समजून घेण्यासाठ येशू पाटील यांच्याशी संवाद साधला. या संवादातून जाणून घेतलेला 'शब्द- द बुक गॅलरी' ते 'मुक्त शब्द' हा प्रवास.

**'शब्द'शी जोडली जाण्याची प्रक्रिया केव्हापासून आणि कशी सुरू झाली?**

- शब्द, साहित्य, प्रकाशन संस्था या गोष्टींपासून मी तसा फार लांब होतो. ही संस्था अस्तित्वात येण्याच्या आधी मी इस्टेट एजंट म्हणून काम करत होतो तसंच कोचिंग क्ला चालवत होतो. माझ्या कोचिंग क्लासच्या शेजारचा गाळा (बोरिवलीच्या वजिरा नाक्याजवळ) रिकामा होता. या गाळ्यात काय सुरू करावं असा विचार चालू असताना मोठ्या भावाने म्हणजे कपिल पाटीलने सल्ला दिला, की पुस्तका दुकान सुरू कर. मग मी २००३ मध्ये 'शब्द- द बुक गॅलरी' हे पुस्तकांचं दुकान सुरू केलं. तेव्हापासून साहित्य, पुस्तकं, प्रकाशन व्यवहार, पुस्तक वितरण या क्षेत्राशी स्वतःला जोडून घेतलं. अर्थात हे दुकान सुरू करण्यापूर्वी एक सर्व्हे मात्र मी माझ्यापुरता केला होता जो वाचनसंस्कृतीला पूरक ठरणा होता.





# प्रकाशक आणि त्यांचे प्रकल्प

सुजाता शेणई

**वाचक, वाचनसंस्कृती, ग्रंथनिर्मिती आणि ग्रंथवितरण यांचं परस्परावलंबन असतं. 'शब्द- द बुक गॅलरी' सुरू करताना असा काय विचार केला होता?**

- निश्चितच विचार केला होता. वर म्हटल्याप्रमाणे मी सुरुवातीलाच एक सर्व्हे केला होता. त्या काळात मध्य व दक्षिण मुंबईतून बाहेर पडलेली मराठी कुटुंबं उपनगरांमध्ये स्थिरावलेली होती, पण त्यांच्या सांस्कृतिक आणि साहित्यविषयक गरजा भागवणारी यंत्रणा या परिसरात निर्माण झाली नव्हती. त्यामुळे अशी यंत्रणा जर आपण उभी केली तर वाचकांची सांस्कृतिक, साहित्यिक गरज भागवली जाईल आणि हे वाचक 'शब्द'शी कोणत्या ना कोणत्या प्रकारे जोडले जातील असा विश्वास होता. त्यातूनच हा उपक्रम सुरू केला. वाचकांना पुस्तकं उपलब्ध करून देणे, हा मर्यादित हेतू बाजूला सारून २००४ मध्ये मुकुंद कुळे यांच्या सहकार्याने 'शब्द दीपोत्सव' हा दिवाळी अंकही काढला.

**'शब्द पब्लिकेशन'ची सुरुवात कशी झाली? यामागची भूमिका कोणती होती?**

- 'शब्द दीपोत्सव'बरोबरच 'पंचलावण्य' हे लावणीक्षेत्रात काम करणाऱ्या कलावंतांच्या जीवनावरील एक ललित पुस्तक आणि अनंत सामंत यांची 'मितवा' ही कादंबरी प्रकाशित केली. ही पुस्तकं म्हणजे 'शब्द पब्लिकेशन'ने प्रकाशन व्यवसायात टाकलेलं पाऊल होतं. पण भूमिका म्हणाल, तर 'खप आणि पुरस्कारप्राप्ती हे निकष न ठेवता साहित्यक्षेत्रात माइलस्टोन ठरेल अशी साहित्यकृती शब्द पब्लिकेशनतर्फे प्रकाशित होईल अशी ओळख आणि वाटचाल शब्दची असावी' असं ठरवलं होतं. लेखनाचं गांभीर्य जपणारे नवे लेखक; 'समाज, राजकारण, संस्कृती' यांचं प्रखर भान; खुलेपणा, गुणवत्तेशी इमान या गोष्टींना पब्लिकेशनच्या धोरणात प्राधान्य दिलं गेलं. विविध प्रकारचे साहित्यप्रकार शब्द पब्लिकेशनच्या माध्यमातून पुढे येत राहतील याची काळजी घ्यायची असं ठरलं. या धोरणाला अनुसरून आजवर अनेक ग्रंथांची निर्मिती झाली. उदाहरणंच द्यायची झाली, तर अविनाश सहस्रबुद्धे यांचं वैचारिक लेखन 'धर्म आणि धम्म', रेणू गावस्कर यांचं वेगळ्या विषयावरील ललित लेखन 'आमचा काय गुन्हा?' (याची पाचवी आवृत्ती नुक्तीच प्रकाशित झाली), डॉ. विलास सारंग यांचा 'चिरंतनाचा गंध' हा कथासंग्रह आणि विश्राम गुप्ते यांची 'नारी डॉट कॉम' ही कादंबरी... अशी कितीतरी देता येतील. याशिवाय समीक्षा, चरित्र, अनुवाद, लेखसंग्रह, नाटक, संपादन असे विविध प्रकार आम्ही आतापर्यंत हाताळले आहेत, हाताळत आहोत.

**नव्या लेखनाबरोबरच महत्त्वाच्या जुन्या लेखकांचं पुनरावतरण आपण करत आहात. या प्रकल्पाविषयी काय सांगाल?**

- शब्द पब्लिकेशनचं काम जोरात सुरू झालं असतानाच २००७ मध्ये नामदेव ढसाळ यांच्यासारखा जागतिक कीर्तीचा कवी 'शब्द पब्लिकेशन'शी जोडला गेला. त्यांच्या निवडक कवितांचा 'मी भयंकराच्या दरवाज्यात उभा आहे' हा उत्तम निर्मितिमूल्यं असलेला संपादित संग्रह आम्ही प्रकाशित केला. त्यामुळे मराठी साहित्यविश्वाला 'शब्द'ची दखल घ्यावी लागली. नामदेव ढसाळ यांचं समग्र साहित्य पुनर्प्रकाशित करण्याचा प्रकल्प सध्या आमच्याकडे सुरू आहे.

दुर्गा भागवत यांचा उल्लेख आपण विदुषी म्हणून करतो. लोकसाहित्य, मानववंशशास्त्र, समाजशास्त्र, धर्मविचार या साऱ्या अभ्यासविषयांसह दुर्गाबाईंनी ललित लेखनही केलं. ललित लेखनाची निश्चित, पूर्वसुरींनी साचेबद्ध केलेली चाकोरी दुर्गाबाईंना कधीच मानवली नाही. दुर्गाबाईंचा प्रत्येक लेख एक नवा प्रत्यय देणारा असतो. दुर्गाबाईंच्या असंकलित लेखांचं मीना वैशंपायन यांनी केलेलं संपादन आम्ही 'विचारसंचित', 'भावसंचित' आणि 'संस्कृतिसंचित' अशा तीन भागांत प्रकाशित केलं. यावरोबरच 'दुर्गुआजीच्या गोष्टी' हे त्यांचं गोष्टींचं पुस्तकही प्रकाशित केलं. या निमित्ताने हा मोठा प्रकल्पच झाला म्हणा ना!

मराठीतील चाळीस वर्षांपूर्वीची किरण नगरकर यांची 'सात

सक्कं त्रेचाळीस' ही कादंबरी, 'माहीमची खाडी' ही मधु मंगेश कर्णिक यांची कादंबरी पुढे आम्ही पुनर्प्रकाशित केली, तर भाऊ पाध्ये यांचं समग्र साहित्य आम्ही पुनर्प्रकाशित करत आहोत. यातील काही साहित्य प्रकाशित झालं आहे तर काही प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**'वैचारिक कस' याला 'शब्द पब्लिकेशन'मध्ये फार महत्त्व आहे असं दिसतं. त्याबद्दल काय सांगाल?**

- हो. 'शब्द पब्लिकेशन' एकोणिसाव्या शतकातील वैचारिक लेखनाच्या सकस परंपरेशी आपलं नातं जोडण्याचा आवर्जून प्रयत्न करत आहे. येणाऱ्या काळात 'नवभारत' मासिकाच्या गेल्या पन्नास वर्षांतील अंकांत प्रसिद्ध झालेले आर्थिक, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक आदी विषयांवरील लेखन आम्ही खंडात्मक स्वरूपात प्रसिद्ध करणार आहोत. एकोणिसाव्या शतकातील 'दीनमित्र'कार मुकुंदराव पाटील यांचं विखुरलेलं, असंकलित व अप्रकाशित लेखन आम्ही प्रसिद्ध करणार आहोत. ज्येष्ठ समीक्षक म. सु. पाटील यांच्या समीक्षात्मक लेखांचे तीन खंड व डॉ. हरिश्चंद्र थोरात यांचे 'समकालीन कथनमीमांसा' व 'मराठी कादंबरीचा इतिहास' हे खंड प्रकाशनाच्या वाटेवर आहेत. ज्येष्ठ विचारवंत आणि समीक्षक दि. के. बेडेकर यांचं अप्रकाशित वाङ्मय प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे. एकूणच, 'शब्द पब्लिकेशन'ची ओळख स्वातंत्र्य, समता, बंधुता, धर्मनिरपेक्षता, सामाजिक न्याय, अन्यायाचा प्रतिकार या मूल्यांना उठाव देणारी म्हणून व्हावी असाच आमचा कायम प्रयत्न राहील. त्यामुळेच 'निर्भय विचारांना पंख आणि निखळ निर्मितीला आकाश देणारं' शब्द पब्लिकेशन आहे, असं आवर्जून सांगावंसं वाटतं.

**साधारणतः प्रकाशन संस्था स्वतःची मुखपत्रं काढतात. आपण 'मुक्त शब्द' मासिक काढायचं का ठरवलंत?**

- १ मे २०१० हा महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेचा सुवर्णमहोत्सवी दिवस होता. या दिनाचं औचित्य साधून 'मुक्त शब्द' मासिकाची सुरुवात केली. वाचनसंस्कृतीचा विकास आणि साहित्याविषयीच्या समकालीन धारणा पुढे येण्याच्या दृष्टिकोनातून मासिक महत्त्वाचं ठरेल असं वाटलं म्हणून मासिक सुरू केलं. साहित्य, समाज आणि संस्कृती यांच्याविषयी विचार करणारं, निर्भीडपणे विचार मांडणारं एक खुलं व्यासपीठ हे 'मुक्त शब्द' मासिकाचं स्वरूप आहे. यातून राजकीय, सामाजिक विषयांवर भाष्य करणारं गंभीर लेखन; समीक्षा, चित्रपट, नाटक संगीत, चित्रकला आदी विषयांवरील लेखन प्रसिद्ध होतं. अभिव्यक्तीचे नवीनवीन प्रयोग आम्ही करतो. हरिश्चंद्र थोरात, नीतिन रिंढे, राहुल कोसंबी यांच्यासारखे अभ्यासक याची धुरा समर्थपणे सांभाळत आहेत. भारतीय कलांचा विचार करून तयार केलं जाणारं या मासिकाचं मुखपृष्ठही अनेकांच्या चर्चेचा विषय होतो हे समाधानही आम्हाला मिळत आहे.

**'शब्द गप्पा' आणि 'शब्द पुरस्कार' याविषयी काय सांगाल?**

- वाचनसंस्कृतीचा व्यापक प्रसार आणि पू[illegible] वातावरणनिर्मिती साध्य करण्यासाठी २००५ मध्ये 'शब्द गप्पा' सुरू केल्या. यातून वैचारिक देवाणघेवाण तर होतेच, पण साहित्यिक संकल्पनांचं पुनर्भरणही होत असतं. ललित/वैचारिक/अनुवादित साहित्यासाठी 'दुर्गा भागवत पुरस्कार', कथा/कादंबरींसाठी 'बाबूराव बागुल पुरस्कार', एकूण लेखकीय कारकिर्दीसाठी 'भाऊ पाध्ये साहित्य गौरव पुरस्कार' आणि एकूण भारतीय कवितेसाठी 'नामदेव ढसाळ शब्द पुरस्कार' आम्ही सुरू केला आहे. या निमित्ताने चांगलं व सकस साहित्य वाचकांच्या नजरेसमोर यावं, असा आमचा प्रयत्न आहे. त्याचबरोबर चांगला वाचक घडवणं आणि वाचनसंस्कृतीला बळ देणं हे उद्देशही यातून साध्य व्हावेत, अशीही अपेक्षा आहे.

**आगामी काळात 'शब्द'ने कोणकोणत्या योजना आखल्या आहेत?**

- पुढील काळात प्रवीण दशरथ बांदेकर, कृष्णात खोत, राजन गवस, वंदना भागवत, अरुणा देशपांडे यांच्या कादंबऱ्या आम्ही प्रकाशित करत आहोत. वसंत दत्तात्रय गुर्जर यांच्या 'गोदी', 'अरण्य' आणि 'समुद्र' या कवितासंग्रहांचे पुनर्प्रकाशन आम्ही करत आहोत. साठ नंतरच्या लेखन-वाचना[illegible] पारंपरिक अभिव्यक्ती आणि अभिरुचीला मराठी साहित्यातील ज्या महत्त्वाच्या लेखक-कवींनी आमूलाग्र वळण दिलं अशा जवळजवळ सर्वच लेखक-कवींचं साहित्य जाणीवपूर्व[illegible] पुनर्मुद्रित करून अगदी नव्या रूपात आम्हाला वाचकांसमोर आणायचं आहे. याशिवाय आदिवासींसाठी शैक्षणिक का[illegible] करणाऱ्या कार्यकर्त्यास या वर्षापासून 'मेरी पाटील श[illegible] पुरस्कार' तसेच एक स्मृती व्याख्यान सुरू करत आहोत. राष्ट्रीय पातळीवरील चर्चासत्र आणि 'अतुल्य भेट' मुलाखतींचा कार्यक्रम महाराष्ट्रभर राबवण्याचा मानस आहे.

२००३ ते २०१५ या केवळ बारा वर्षांच्या काळात 'शब्द'ने मराठी साहित्यविश्वात एक चांगला ठसा उमटवला आहे. येशू पाटील यांना स्वतःची ओळख छायाचित्रातून देण्यापेक्षा 'शब्द हेच माझे छायाचित्र' अशी द्यावीशी वाटते. यातूनच त्यांची 'शब्द'शी असलेली बांधिलकी स्पष्ट जाणवते.

◆

**प्रा. सुजाता शेणई**
भ्रमणध्वनी : ९०११०१७९१६

**येशू पाटील**
भ्रमणध्वनी : ९८२०१४७२८४



## निमित्त : अतिथी निवास सुवर्णमहोत्सव

वसंत स. जोशी

**महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अतिथी निवासाला नुकतीच पन्नास वर्षे पूर्ण झाली. गेल्या पन्नास वर्षांत मराठी साहित्यविश्वातल्या अनेकांचे या निवासाशी ऋणानुबंध जडले आहेत. या वास्तूत निवास करणाऱ्यांना ते एक ऊर्जाकेंद्रच वाटत आले आहे. या निवासात दीर्घकाळ निवास केलेल्या डॉ. वसंत स. जोशी यांचा निवासाच्या आठवणींना उजाळा देणारा लेख.**

पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'अतिथी निवासा'ला या वर्षी पन्नास वर्षे पूर्ण होत आहेत, सुवर्ण महोत्सव साजरा होत आहे. ही वार्ता वाचून मन चाळीस वर्षे मागे गेले आणि 'अतिथी निवासा'तील घटनांच्या कित्येक स्मृती जाग्या झाल्या. म. सा. पषिदेची इमारत शहराच्या अगदी मध्यभागी असलेली. आजूबाजूला न्यू इंग्लिश स्कूल, स. प. महाविद्यालय अशा शिक्षणसंस्था; भारत इतिहास संशोधन मंडळ, भरत नाटच मंदिर, गीता धर्म मंडळ अशा सांस्कृतिक संस्था; वसंत व्याख्यानमाला, शिवाजी मंदिर, केसरी-सकाळ अशा वृत्तपत्रांची, नियतकालिकांची कार्यालये, प्रकाशन संस्था, कल्पना-आनंद इ. मुद्रणालये इ. बौद्धिक वातावरणाने भारलेला परिसर आजूबाजूला. स्वाभाविकच त्याच्याशी संबंधित परगावच्या व्यक्तीच्या मुक्कामाला सर्वार्थाने अनुकूल असे हे 'अतिथी निवास.' परगावहून येणाऱ्या व्यक्तीला ते खूपच सोयीचे.

टिळक रस्त्याला छेद देणाऱ्या रस्त्याच्या कोपऱ्यावर मोक्याच्या जागी साहित्य परिषदेची आटोपशीर इमारत उभी आहे. या परिषदेशी कार्यकारी मंडळाचा सदस्य म्हणून पंधरा वर्षे (१९७३ ते १९८८) माझा संबंध आला. 'म. सा. पत्रिके'चा संपादक, 'भाषा व साहित्य : संशोधन' प्रकल्पाचा प्रमुख, बहिस्थ कार्यवाह इ. नात्यांनी मला काम करण्याची संधी मिळाली. त्या वेळी मी वाई महाविद्यालयात मराठीचा प्राध्यापक म्हणून काम करत होतो. पुण्यात आल्यानंतर स्वाभाविकपणे माझे वास्तव्य साहित्य परिषदेच्या 'अतिथी निवासा'त असे. या पंधरा वर्षांत अनेक साहित्यिक आणि साहित्यविषयक उपक्रम यांच्याशी माझा संबंध आला.

साहित्य परिषदेची प्रारंभीची छोटी इमारत गरजेनुसार वाढत गेली. खालच्या मजल्यावर परिषदेचे कार्यालय आणि सभागृह, त्याच्यावर एक मोठी खोली, वरच्या मजल्यावर समृद्ध ग्रंथालय आणि त्याच्या जवळच चार खोल्यांचे अतिथी निवास व पुढे थोडी मोकळी जागा. प्रत्येक खोलीत दोन व्यक्तींची निवासव्यवस्था होती. ग्रंथालय व अतिथी निवास यांच्यामधल्या जागेत स्वच्छतागृह होते. इमारतीच्या वरच्या भागावर एक छोटीशी गच्ची होती. तिथे



# साहित्य परिषदेचा सुखनिवास

# महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अतिथी निवासाचा सुवर्णमहोत्सवी स्नेहमेळावा

बाहेरगावाहून पुण्यात कामासाठी येणाऱ्या साहित्य व्यवहारातील लेखक-प्रकाशक-ग्रंथविक्रेते-मुद्रक-चित्रकार आदी मंडळींचं निवासाचं महत्त्वाचं ठिकाण म्हणजे महाराष्ट्र साहित्य परिषदेचं अतिथी निवास. १५ ऑगस्ट १९६४ रोजी सुरू झालेल्या या निवासाने नुकतीच पन्नास वर्षं पूर्ण केली. अनेक ज्येष्ठ साहित्यिकांनी या निवासात मुक्काम केला आहे. त्यांच्या अनेक मैफली या निवासात रंगल्या आहेत. साहित्य व्यवहारातल्या अनेक घटना-घडामोडींचं हे अतिथी निवास साक्षीदार आहे. इथल्या प्रसन्न वातावरणामुळे इथे निवास करणाऱ्या प्रत्येकालाच ते ऊर्जाकेंद्र वाटत आलं आहे. त्यामुळे साहित्य क्षेत्रातल्या अनेकांचे या वास्तूशी-निवासाशी घट्ट ऋणानुबंध तयार झाले आहेत.



सुवर्ण महोत्सवी स्नेहमेळाव्यानिमित्त उपस्थित डॉ. द. ता. भोसले, डॉ. माधवी वैद्य तसेच परिषदेचे इतर कार्यकर्ते.



या ऋणानुबंधांना उजाळा देण्यासाठी सुवर्णमहोत्सवी स्नेह-मेळाव्याचं दि. २७ मे २०१५ रोजी आयोजन करण्यात आलं होतं. ज्येष्ठ लेखक डॉ. द. ता. भोसले यांच्या

काही वेळा साहित्यिक गप्पांसारखे कार्यक्रम होत.

अतिथी निवासासाठी एकच स्नानगृह असल्याने तिथे वास्तव्य करणाऱ्यांना बराच वेळ तिष्ठत राहावे लागे. यावर प्राचार्य राम शेवाळकर यांनी एक तोडगा काढला होता. ते रात्रीच्या वेळी दाढी करत आणि पहाटे लवकर उठून अंघोळ करीत व लगेच कामासाठी बाहेर पडत. कुणी अतिथी स्नानासाठी आत जाई आणि स्नान, सर्व कपडे धुणं झाल्यानंतरच बाहेर येई. अशा वेळी बाहेर तिष्ठत उभ्या राहिलेल्याचा चेहरा वैतागपूर्ण होत असे. अतिथी निवासाच्या समोरच्या जागेतील कठड्यावरून खालील रस्त्यावरचे 'अमृततुल्य' हॉटेल दिसत असे. वरून जोरात टाळ्या वाजवून किती कप चहा हवा आहे ते बोटांच्या खुणांनी दाखवले की थोड्याच वेळात किटली आणि कपबश्या घेऊन हॉटेलचा नोकर येत असे. ही त्याची सेवा केव्हाही उपलब्ध असे. त्यामुळे खोलीतील पार्टनरसोबत गप्पा मारत गरम गरम चहा घेता येई.

साहित्य परिषदेची सारी वास्तूच साहित्यिक वातावरणाने भारलेली आहे. अतिथी निवासाशेजारचे संदर्भ ग्रंथालय अभ्यासकांना सोयीचे आणि उपयुक्त होते. त्या वेळी श्रीमती इंदुताई गोखले या ग्रंथपाल होत्या. मितभाषी पण ग्रंथसेवा देण्यात त्या तत्पर असत. त्यांचे अक्षर नेटके व सुंदर होते. 'भाषा व साहित्य संशोधन' हा ग्रंथ सिद्ध करताना इंदुताईंनी आपल्या सुरेख अक्षरांत काही लेखांच्या मुद्रणप्रती तयार करून दिल्या होत्या. तेथील ग्रंथ चाळण्यात, नियतकालिके वाचण्यात वेळ चांगला जाई. तेथून खाली उतरले की त्या मजल्यावर होणाऱ्या विविध बैठकींचे स्मरण होई. तळमजल्यावर आले की डाव्या बाजूस कोच ठेवलेली खोली. तिथे भेटणाऱ्

अध्यक्षतेखाली हा स्नेहमेळावा आयोजित करण्यात आला होता. यात डॉ. द. ता. भोसले यांच्यासहित या निवासात मुक्काम केलेल्या रंगनाथ पठारे, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, अरुण गाडगीळ, डॉ. पुरुषोत्तम काळे पद्माकर कुलकर्णी, राजन मुठाणे मधू नेने, श्याम जोशी, सुमती लांडे, डॉ. शशिकला पवार, प्रा. मेधा काळे, वृषाली आफळे, डॉ. राजेंद्र माने, उत्तम कोळगावकर, श्रीनिवास वारुंजीकर आदींनी आपल्या या निवासाच्या आठवणींना उजाळा दिला. या निवासाचा पन्नास वर्षांचा व्यापक कालपटच त्यातून उलगडला गेला. १०९ वर्षांची दीर्घ परंपरा असलेल्या मसापच्या वास्तूचा इतिहास लिहिला जावा, अशीही एक महत्त्वपूर्ण सूचना या मेळाव्यात करण्यात आली. ती निश्चितच स्वागतार्ह आहे.

या निमित्ताने या निवासाच्या देखभालीत महत्त्वपूर्ण योगदान देणाऱ्या संदीप खाडे, ज्योत्स्ना नांदगिरीकर, भारती निनगुरकर वैशाली गोरे, घाडोमावशी, चंद्रशेखर केळकर, राजेंद्र तुपे आदींचा विशेष सत्कार करण्यात आला.

मेळाव्यात मनोगत व्यक्त करताना अरूण गाडगीळ

मेळाव्याला उपस्थित असलेले मान्यवर

या कार्यक्रमाला परिषदेच्या उपाध्यक्ष चंद्रकांत शेवाळे, कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनील महाजन, प्रमोद आडकर, डॉ. कल्याणी दिवेकर, नंदा सुर्वे, सुनीताराजे पवार, ॲड. जे. जे. कुलकर्णी आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचं प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी. तर महेंद्र मुंजाळ यांनी सूत्रसंचालन केलं.

साहित्यिकांशी, अभ्यागतांशी गप्पा मारता येत. समोरच्या खोलीत परिषदेचा कर्मचारी वर्ग बसलेला असे. म. श्री. दीक्षित हसतमुखाने स्वागत करीत. डाव्या बाजूच्या खोलीत कार्याध्यक्ष व काही अभ्यागत चर्चा करीत बसलेले असत. मी कार्यकारी मंडळाचा सदस्य असल्याने त्या चर्चेत सहभागी होत असे. याच ठिकाणी अनेक प्रतिष्ठित व्यक्ती, साहित्यिकांशी माझा परिचय झाला. शेजारच्या माधवराव पटवर्धन सभागृहात सतत काही ना काही कार्यक्रम होत असत. त्यासाठी पाहुण्यांसमवेतच आम्ही कार्यक्रमासाठी सभागृहात जात असू.

'अतिथी निवासा'त राहण्यामुळे महाराष्ट्रातील कित्येक साहित्यिकांचा परिचय, गाठीभेटी होत, गप्पा होत. त्यामुळे खूप बरे वाटे. माझे वास्तव्य निवासात असताना लक्षात राहिलेल्या काही प्रसंगांची नोंद येथे करतो. परिषदेच्या अतिथी निवासात दलित साहित्यिकांनी यावे, राहावे असा प्रयत्न प्रथम प्रा. गं. बा. सरदार यांनी केला. वामन निंबाळकर, बाबूराव बागुलांचा परिचय त्यामुळेच झाला. शंकरराव खरात तर कार्यकारी मंडळाचे सदस्यच होते. विजय तेंडुलकरांचा प्रत्यक्ष परिचय झाला नसला तरी शेजारच्या खोलीतील अभ्यागताशी गप्पा मारताना मी त्यांना पाहिले होते. डॉ. वि. म. कुलकर्णी हे माझ्याकडे नेहमी येत. एकदा ते पद्मा गोळे आणि अनुराधा पोतदार यांना घेऊन माझ्या खोलीवर आले. त्यानंतर त्यांनी आपापल्या कवितावाचनाची आवर्तने केली. त्यांच्यासमवेत घेतलेला काव्यानंद अविस्मरणीय आहे. राम शेवाळकर बऱ्याच वेळा अतिथी निवासात उतरत. त्यांच्याशी होणाऱ्या गप्पा खूप काही देऊन जात. त्यांचा हा परिचय त्यांच्या अंतापर्यंत अधिकाधिक दृढ होत गेला. वाई. कोल्हापूर येथील माझ्या

घरीही ते येत राहिले. एकाच खोलीत डोंबिवलीचे प्रभाकर अत्रे व रवींद्र पिंगे यांच्या समवेत राहण्याचा योग अनेक वेळा आला. दोघांचीही कामे साहित्याच्या संदर्भात असत. प्रकाशकांच्या/नियतकालिकांच्या संपादकांच्या गाठीभेटी, चर्चा वा तत्सम कारणांसाठी त्यांना यावे लागे. या दोघांशीही मनमोकळ्या गप्पा होत. नवी माहिती मिळे. सुप्रसिद्ध कवी उत्तम कोळगावकर यांचाही परिचय इथेच झाला आणि पुढे तो वाढत गेला. जळगाव आणि धुळे या ठिकाणी ते असताना आकाशवाणीवर भाषणेही झाली. माझ्या मुलीलाही अंशकाल आकाशवाणी कार्यालयात काम करण्याची संधी मिळाली. प्रभाकर अत्रे म.सा.प.च्या कार्यकारी मंडळावर होते. त्यामुळे परिषदेच्या कामासाठी आम्ही दोघे एकत्र असू.

सुप्रसिद्ध मराठी गझलकार सुरेश भट यांचा परिचय परिषदेतच एका भेटीत झाला. त्यातून स्नेह वाढत गेला. पत्रव्यवहारही झाला. त्यातून 'गझल विशेषांका'ची कल्पना निघाली. त्यासाठी सुरेश भटांनी मला सर्व प्रकारची मदत केली. नव्या दमाच्या गझलकारांच्या ५० गझला निवडून, संस्कार करून त्यांनी पाठविल्या. अंकासंदर्भात गझलविषयी त्यांनी अनेक पत्रे पाठवली. ती माझ्या संग्रहात आहेत. सुरेश भट हे तसे उग्र दैवत होते, पण त्यांनी या अंकासाठी डॉ. अक्षयकुमार काळे यांना प्रदीर्घ मुलाखत दिली. एकदा माझा अतिथी निवासात मुक्काम असताना गझलगायनाचा कार्यक्रम ठरला. रात्री नऊ वाजता सुरेश भट आपल्या शिष्यांसह अतिथी निवासातील माझ्या खोलीवर आले. सर्वांनीच खोलीपेक्षा बाहेरील फरशीवर बसण्याचे ठरवले. वृत्तपत्राचा कागद फरशीवर ठेवून त्यावर भरपूर भेळभत्ता ठेवला आणि गझलांची मैफल सुरू झाली. दीपक करंदीकर, रमण रणदिवे, म. भा. चव्हाण व अन्य दोघे-तिघे मराठी गझलकार होते. त्यांनी आपापल्या गझला पेश करण्यास सुरुवात केली आणि मैफल रंगत गेली. एखादा शेर गझलकाराने म्हटला की दुसऱ्यांनी तो उचलून धरून पुन्हा म्हणायचा. सुरेश भटही 'वाहवा, बहोत खूब' म्हणून दाद द्यायचे. त्यांनी नंतर स्वतःच्याही काही गझला म्हटल्या. त्या ऐकून श्रोते भारावले, खूष झाले. असे एकेक कवीचे आवर्तन सुरू होत गेले. एक वेगळी धुंदी त्या गझलांतील भाव आणि शब्दयोजना, त्यांचे आवर्तन, फर्माइश यामुळे चढत गेली. समोरील भेळभत्त्याचा ढीग हळूहळू कमी होत गेला तशी मैफलही संपत आली. 'वा, बहोत मज़ा आया' या सुरेश भटांच्या उद्गारांनी तिचा शेवट झाला. त्या वेळी रात्रीचे अकरा वाजले होते. अशी ही गझलगायनाची मैफल सुरेश भटांच्या उपस्थितीमुळे, त्यांच्या दिलखुलास प्रतिसादाने, रात्रीच्या गहिऱ्या वातावरणातील पार्श्वभूमीवर संस्मरणीय ठरली.

ज्याच्यामुळे अतिथी निवासातील अभ्यागतांचे वास्तव्य सुखाचे झाले त्या मारुती पवार या सेवकाचे स्मरण अपरिहार्य आहे. ज्या काळात म. श्री. दीक्षित हे प्रा. श्री. म. माटे यांचे बोट धरून परिषदेत आले, त्याच काळात मारुती पवारही परिषदेच्या सेवेत रुजू झाला. या दोघांनीही अतिथींच्या रागालोभाची, त्यांच्या गरजांची आस्थापूर्वक काळजी घेतली. म. श्री. दीक्षित यांनी त्यांच्या माणसे जोडण्याच्या स्वभावामुळे लिपिकापासून विश्वस्तपदापर्यंत अनेक पदे भूषवली. मारुती पवार मनोबलाने आपल्या वाटेचाची कामे मनापासून करीत राही. अनेक मोठ्या साहित्यिकांशी त्याचा परिचय होता. त्यांच्या अनेक आठवणीही त्याच्याकडे होत्या. आलेल्या अतिथींच्या खोलीचे कुलूप काढून चावी देणे, अंथरूण-पांघरूण नीट करणे, आवश्यक तर खोली झाडून काढणे, पाणी तांब्यात भरून ठेवणे अशी लहान-मोठी कामे तो अबोलपणे करत राहायचा. एकदा पहाटे सुप्रसिद्ध कवी प्रा. फ. मुं. शिंदे आपल्या मित्रासह औरंगाबादहून आले. त्यांनी मारुतीला उठवले. अतिथी निवासात दोघांना जागा नसल्याचे मारुती सांगत होता आणि प्रा. शिंदे त्याला काहीही सोय करण्याचा आग्रह करत होते. मलाही पहाटेच्या बसने वाईस जावयाचे असल्याने खोलीला कुलूप लावून मी खाली आलो. त्या वेळी मारुतीने सर्व हकीकत सांगितली. पहाटेचा गारवा होता. प्रा. शिंदे आपल्या सर्वांगावर शालीची खोळ मारून उभे होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाने मारुती दबला होता. मी शिंदे यांना ओळखत होतो. "अरे मारुती, यांना ओळखत नाहीस? हे औरंगाबादचे कवी फ. मुं. शिंदे." मी म्हटले आणि "माझ्याकडची ही किल्ली घे आणि त्यांची व्यवस्था कर", असे सांगितले. तो नम्रपणे त्या दोघांनाही घेऊन अतिथी निवासात गेला. ज्यांनी ज्यांनी अतिथी निवासात वास्तव्य केले असेल त्यांना या मारुतीच्या सेवेचं स्मरण झाल्याखेरीज राहणार नाही.

...त्याचबरोबर हा अतिथी निवास उभारून परिषदेत येणाऱ्या अभ्यागतांसाठी तो उभारणीसाठी मनःपूर्वक प्रयत्न करणारे न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ आणि बृहन्महाराष्ट्र मंडळ यांचेही कृतज्ञतापूर्वक स्मरण करणे अपरिहार्य आहे. या सर्वांच्या म. सा. परिषदेवरील प्रेमामुळेच येथे वास्तव्य करणाऱ्या प्रत्येकाला 'अतिथी निवास' ही केवळ राहण्याची जागा नव्हे तर सुखनिवास वाटतो.

◆

डॉ. वसंत स. जोशी
दूरध्वनी : ०२०-२५३६१७४४



अनुक्रमणिका

नंदा सुर्वे

# मसाप ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कार

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कार वितरण कार्यक्रम, तसेच १०९ वा वर्धापनदिन समारंभ दि. २६ व २७ मे २०१५ रोजी संपन्न झाला. पुरस्कार वितरण समारंभाच्या प्रमुख पाहुण्या म्हणून ज्येष्ठ लेखिका मंगला गोडबोले यांची, तर वर्धापनदिन समारंभाचे प्रमुख पाहुणे म्हणून माजी सनदी अधिकारी अविनाश धर्माधिकारी यांची उपस्थिती होती.

दि. २६ मे २०१५ रोजी मंगला गोडबोले यांच्या हस्ते ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कारांचे वितरण झाले. यातील पुरस्कारप्राप्त ग्रंथकारांची छायाचित्रे सोबत देत आहोत. तसेच, ज्या ग्रंथांना पारितोषिक देऊन गौरविण्यात आले त्या वाङ्मयाकृतींचा थोडक्यात परिचय करून दिला आहे- मसापच्या वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार निवड समितीच्या निमंत्रक नंदा सुर्वे यांनी.

## मसाप विशेष ग्रंथकार पुरस्कार

◆ संतसाहित्यविषयक लेखनासाठी दिला जाणारा डॉ. शं. दा. पेंडसे पुरस्कार या विषयाचे अभ्यासक अभय टिळक यांना प्रदान करण्यात आला.

◆ संगीतसमीक्षेसाठी दिला जाणारा मा. कृष्णराव फुलंब्रीकर पुरस्कार ज्येष्ठ गायिका-आस्वादक शैला दातार यांना प्रदान करण्यात आला.

◆ ज्येष्ठ कवी-कवयित्रीस दिला जाणारा कविवर्य भा. रा. तांबे पुरस्कार कवयित्री संगीता जोशी यांना प्रदान करण्यात आला.

◆ गेय कविता लिहिणाऱ्या कवीस दिला जाणारा कविवर्य ना. घ. देशपांडे पुरस्कार कवी अशोक बागवे यांना प्रदान करण्यात आला.

◆ विज्ञानविषयक लेखनासाठी दिला जाणारा प्रा. गो. रा. परांजपे पुरस्कार विज्ञान कथा-कादंबरी लेखक डॉ. संजय ढोले यांना प्रदान करण्यात आला.

◆ संदर्भग्रंथ, अनुवाद-आंतरभारती कार्यासाठी दिला जाणारा श्रीपाद जोशी पुरस्कार यंदा ज्येष्ठ कवी-अनुवादक प्रा. चंद्रकांत पाटील यांना प्रदान करण्यात आला.

◆ नाट्यविषयक लेखनासाठी दिला जाणारा कमलाकर सारंग पुरस्कार यंदा तरुण नाटककार इरावती कर्णिक यांना प्रदान करण्यात आला.

◆ बालसाहित्यात महत्त्वपूर्ण योगदान दिलेल्या लेखकास दिला जाणारा ग. ह. पाटील पुरस्कार यंदा डॉ. संगीता बर्वे यांना प्रदान करण्यात आला.

◆ साहित्य क्षेत्रात महत्त्वपूर्ण योगदान दिलेल्या स्त्री लेखिकेसाठी दिला जाणारा ज्योत्स्ना देवधर पुरस्कार ज्येष्ठ लेखिका डॉ. विजया वाड यांना प्रदान करण्यात आला.

◆ संपादन क्षेत्रातील लक्षणीय योगदानासाठी दिला जाणारा प्रभाकर संत पुरस्कृत आशा प्र. संत पुरस्कार ज्येष्ठ संपादक भानू काळे यांना प्रदान करण्यात आला.



अनुक्रमणिका

## विशेष पुरस्कार (म. सा. पत्रिका)



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेतील उत्कृष्ट लेखासाठी दिला जाणारा यशवंतराव गडाख पुरस्कृत श्रीमती ताईसाहेब कदम पुरस्कार ज्येष्ठ कवयित्री डॉ. प्रभा गणोरकर यांना प्रदान करण्यात आला. पत्रिकेच्या अंक क्र. ३४९ मधील 'ईश्वर डॉट कॉम - धर्माच्या बाजाराचे मिश्किल दर्शन' या लेखासाठी त्यांना हा पुरस्कार देण्यात आला.



- **वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी)**
  **'सुंभ आणि पीळ'/ल. सि. जाधव/साकेत प्रकाशन**

ही शोषित मातंग समाजाच्या अनेक पदरी जीवनरीतीचं वास्तव उलगडून दाखवणारी एक अतिशय अभिनव कादंबरी आहे. मातंग समाजाच्या गुंतागुंतीच्या जीवनरीतीतही समर्थपणे उभं राहून त्याला सामोरं जाणं: मजबूत. एकजीव सुंभातील चिवट पिळाप्रमाणे खंबीर राहणं, डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील कार्यकर्त्यांचं प्रबोधन, अस्मितेच्या जागृतीची दखल, धर्मांतर चळवळ अशा अनेकविध प्रश्नांची उकल अत्यंत कळकळीने, व्यापक करुणेच्या भूमिकेतून लेखकाने इथे समर्थपणे मांडली आहे. प्रभावी शब्दरचना, नितळ शैली यातून लेखकाने दाहक, विदारक सत्य वाचकांसमोर मांडलं आहे.



- **ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा)**
  **'साहित्य आणि सांस्कृतिक संवेदन'/प्रभाकर बागले/शब्दालय प्रकाशन**

समकालीन साहित्यकृतींची यातील समीक्षा रसिकांच्या वाचनप्रेमाला दिशादर्शक ठरणारी आहे. लेखक बागले यांची साहित्यविषयक आस्थाबुद्धी, चिकित्सक समीक्षादृष्टी, व्यासंग आणि परिभाषानिर्मितीची क्षमता ह्या निकषांतून परीक्षकांनी या ग्रंथाची निवड केली आहे. बहिणाबाई चौधरींपासून संतोष पवारांपर्यंत अनेक लेखक-लेखिकांच्या साहित्यकृतींसंदर्भातीले हे लेख समीक्षेच्या क्षेत्रात नवी भर घालणारे आहेत. लेखकाची सर्जनशीलतेसंदर्भातील निरीक्षणे अभिरुचिसंपन्न बनवण्याच्या दिशेने उपयुक्त आहेत.



- **वासुदेव धोंडो व भागीरथीबाई दीक्षित पारितोषिक (संत/धार्मिक)**
  **'संत नामदेव परिवाराची कविता'/डॉ. शिवाजीराव मोहिते/स्नेहवर्धन प्रकाशन**

संत नामदेवांच्या 'विस्तारित परिवाराची कविता' हा लेखकाचा अभ्यासविषय असल्याचे यात दिसते, इतकी सविस्तर माहिती या पुस्तकात आली आहे. या परिवारात विविध जाती-जमातींतील सर्व स्त्री-पुरुष संत इत्यादींचा विचार समाविष्ट झाला आहे. संत नामदेव परिवारातील त्यांचे कुटुंबीय, शिष्य परिवार तसेच समकालीन वारकरी पंथातील संतांचा विचार यात करण्यात आला आहे. असा एकत्रितपणे व संशोधनाची शिस्त पाळत केलेला विचार संतसाहित्याच्या अभ्यासकांच्या दृष्टीने उपयुक्त ठरावा.



- **लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख पारितोषिक (ललितेतर वैचारिक)**
  **'धागे अरब जगाचे'/विशाखा पाटील/राजहंस प्रकाशन**

अरब देशातील लोकांबद्दल अनेक समज-गैरसमज प्रचलित आहेत. 'खजुरांचा, उंटांचा आणि श्रीमंतांचा देश' अशी सामान्य माणसांच्या मनातील या देशाबाबतची प्रतिमा स्पष्ट करण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. केवळ वर्णनांवर न विसंबता अरबांच्या देशातील बारीकसारीक प्रश्नांची चर्चा या पुस्तकात आली आहे. संशोधकाला आवश्यक अशी वैचारिक शिस्त बाळगून वाचकांपर्यंत एक समृद्ध अनुभव पोचवला आहे. ग्रंथाला जोडलेली परिशिष्टे केवळ माहितीपर नसून वाचनश्रीमंती देणारी आहेत. नकाशे, कालपट, शिवाय संभ्रमात टाकणाऱ्या शब्दांची उकलही लेखिकेने केली आहे. ग्रंथाला जोडलेली संदर्भसूचीही ग्रंथाच्या मौलिकतेत भर टाकणारी आहे.



अनुक्रमणिका

- **डॉ. ज. रा. कदम पारितोषिक (कृषिविषयक)**
  **'एक कृषी विचारमंथन'/सुधीर फडके/गणराज प्रकाशन**
  'भारत हा कृषिप्रधान देश आहे' हे वाक्य वर्षानुवर्षं कानी पडते आहे, पण ज्याच्या जिवावर शेती करायची तो शेतकरी मात्र हलाखीतच जगताना दिसतो. राज्य व केंद्रशासनामार्फत कृषी उत्पादनवाढीसाठी अनेक योजना राबवल्या जातात. मात्र, कृषी विकासदरात म्हणावी तशी वाढ होताना दिसत नाही. यासाठी कृषिविषयक प्रश्नांच्या गुंत्यातून बाहेर येऊन शेतकऱ्यांना आधुनिक शेतीकडे वळवणे हे मोठे आव्हान आहे. या आव्हानातील अनेक लहान-मोठ्या मुद्द्यांची चर्चा लेखकाने केली आहे. शेतीच्या अर्थशास्त्रापासून, जैव तंत्रज्ञान ते कृषिक्षेत्रासाठी अद्ययावत ब्रॉडबँड सेवेपर्यंतची चर्चा लेखकाने या छोटेखानी पुस्तकात केली आहे ती आवर्जून वाचावी अशी आहे.

- **स. ह. मोडक पारितोषिक (अनुवाद)**
  **'बृहत् भारत'/ मूळ लेखक : शशी थरूर/अनुवादक : आ. श्री. केतकर/चिनार प्रकाशन**
  प्रचंड व्याप्ती असलेल्या भारताच्या आंतरराष्ट्रीय संबंधांचा हा आलेख आहे आणि तोही एका आंतरराष्ट्रीय राजकीय व्यक्तिमत्त्वाने चितारलेला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आंतरराष्ट्रीय स्तरावर विविध प्रकारच्या क्षेत्रांत भारताने केलेल्या कामाबाबत सर्वंकष माहिती देणारं हे पुस्तक आहे. परराष्ट्र धोरण म्हणजे कंटाळवाणा, क्लिष्ट विषय, असं समजणाऱ्यांच्या समजालाच छेद देणारा विषय या ग्रंथात आहे. जिज्ञासू, ज्ञानाकांक्षी वाचकांना तो नक्कीच मार्गदर्शक ठरावा.

- **ग. ल. ठोकळ पारितोषिक (ग्रामीण साहित्य)**
  **'दप्तर'/प्रा. रायभान दवंगे/स्नेहवर्धन प्रकाशन**
  या कथासंग्रहातील 'दप्तर' ही शीर्षककथा; लळा, धरणीकंप, भुसकाट, काळोखाचा अर्थ मुंघेरं, जळीत, रक्तरेषा अशा काही कथा वाचताना ग्रामीण जीवनाचा विविधांगी प्रत्यय येत राहतो. ऊसतोडणी कामगारांशी लेखकाचा जवळून संबंध आला आहे. त्यांच्या अनेक व्यथा लेखकाने कथारूपात मांडल्या आहेत. 'रक्तरेषा' या कथेतील मुस्लिम समाजाचं चित्रण, त्यांची जगण्याची धडपड काळजाला भिडणारी आहे. मुख्यत: या कथासंग्रहातील कथांची आशयसूत्रं ग्रामीण जीवनाचं चित्र उभी करणारी आहेत. त्यांच्या जगण्याभोगण्यातील विदारकता मनाला चटका लावणारी आहे.

- **कृष्णाजी वामन कीर पारितोषिक (ललित गद्य)**
  **'घूमर'/आनंद अंतरकर/मॅजेस्टिक प्रकाशन**
  एकूण तेरा दीर्घ लेखांचा समावेश यात आहे. यामध्ये आत्मपर, निसर्गपर, साहित्यविषयक, संगीतपर, चित्रकलाविषयक अशा अनेक कलाविषयांची हाताळणी केली आहे. 'स्वरलागण', 'माय मसुरी', 'प्रकृतिवृक्ष', 'पारिजात', 'समुद्रसंमोहन', 'सृजनाच्या वाटा' अशा काही शीर्षकांमधूनच लेखकाचं कलासमृद्ध, साहित्यसंपन्न व्यक्तिमत्त्व उभं राहतं. प्रत्येक अनुभव पुन्हा पुन्हा समग्रतेने घेण्याचा ध्यास आंतरकरांमध्ये दिसतो. दैनंदिन आयुष्य जगताना येणारे अनुभव आणि त्यातून होणारं चिंतन, मनन यातून लेखकाचं बहुआयामी व्यक्तिमत्त्व उलगडत जातं. वाचकाला समृद्ध करण्याची ताकद यातील लेखांमध्ये आहे.

- **नी. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट निर्मिती)**
  **'हे विश्वाचे अंगण'/सुधीर जांभेकर/राजहंस प्रकाशन**
  या पुस्तकाचे लेखक आहेत सुधीर जांभेकर. ते स्वत: वास्तुविशारद आहेत. राजहंस प्रकाशनाने प्रकाशित केलेली अंतर्बाह्य अत्यंत देखणी अशी ही साहित्यकृती आहे. मुखपृष्ठ आणि आतील सजावट प्रसिद्ध चित्रकार रविमुकुल यांनी केलेली आहे. उत्कृष्ट निर्मितिमूल्यं असलेलं हे पुस्तक निर्मितिवैभवाची साक्ष देतं.



■ **लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक (आत्मचरित्र)**
**'सतत गैरहजर, सबब नाव कमी'/धोंडुजा इंगोले/जनशक्ती वाचक चळवळ**
लेखकाने मनोगतात म्हटलंय, 'आत्मकथनात्मक साहित्याच्या संदर्भात अनेक आरोप हो असतात, उदा. आत्मचरित्रात स्वत:चे स्तोम किंवा आत्मकरुणाच अधिक असते. स्वत:ला झालेल्या त्रासाचे अवडंबर करतात, आपले रडगाऱ्हाणे मांडत असतात.' पुढे जाऊन लेखकाने म्हटलं 'प्रत्येकजण संघर्षमय जीवन जगतच असतो. म्हणून तो काही साहित्याचा विषय होऊ शकत नाही.' हे भान ठेवून लेखकाने स्वकथन केलंय. अर्थात याला समग्र आत्मचरित्र म्हणता येणार नाही. स्वत: अध्ययन आणि अध्यापन करतानाच्या काळाच्या टप्प्यावर मोठा झोत टाकलेला दिसतो. लेखनात धारदार तक्रारी नाहीत, टोकदार आकस नाहीत. जे अनुभवलं त्यावर टिप्पणी करत ते मांडलंय.




■ **शिवाजी सावंत पुरस्कृत 'मृत्युंजय' पारितोषिक (रामायण, महाभारत, वेदपुराणे)**
**'श्रीमद्भगवद्गीता - खंड दुसरा'/प्रा. खासेराव शितोळे/कुमुदिनी प्रकाशन**
लेखकाने गीतेच्या अनेक असाधारण वैशिष्ट्यांसह महानुभाव तत्त्वाचीही या ग्रंथात साम्य-विशेष या अनुषंगाने चर्चा केली आहे, हे या ग्रंथाचे वेगळेपण आहे. भगवद्गीतेतील अनेक शंकास्थळं आणि वादस्थळं निवडून ती अधोरेखित करताना मूळ अर्थाला धक्का लावलेला नाही. त्याचा अन्वयार्थही विनम्र शब्दांत, अर्थवाही रूपात मांडलेला आहे. प्रत्येक अध्यायाच्या आरंभी त्याच्या शीर्षकाबाबत त्रोटक चर्चा केली आहे. नंतर प्रत्येक श्लोकाचा सारांशरूपाने घेतलेला आढावा; त्यानंतर त्यातले शब्दार्थ, भावार्थ... अशा शिस्तबद्ध पद्धतीने कथासंदर्भाची जोडणी देत केलेला हा लेखनप्रवास लक्षणीय आहे.




■ **कमल भागवत व के. पी. भागवत पारितोषिक (मानसशास्त्र, समाजशास्त्र, स्त्रीजीवनविषयक)**
**'गोष्टी मनाच्या'/डॉ. विजया फडणीस/श्रीवत्स प्रकाशन**
लेखिकेच्या या मनोविश्लेषणात्मक लेखांच्या संग्रहात एकूण १३ लेखांचा समावेश आहे. सध्याच्या बदलत्या व वेगवान जीवनशैलीमुळे मनोविकारांचं प्रमाण वाढत चाललं आहे. अशा विकारांचं गांभीर्य वेळीच जाणून घेणं आणि त्यांची तीव्रता कमी करण्यासाठी वर्तनातील सोपे बदल डॉ. फडणीस यांनी आपल्या लेखात सुचवले आहेत. तसंच सर्वसामान्यांच्या स्वभावदोषांचं अभ्यासपूर्ण विवेचनही यात आलं आहे. रोजच्या वर्तनातील दाखले देऊन गंभीर विषयाची उकल लेखिकेने सहज-सोप्या शैलीत केली आहे.




■ **स. रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ पारितोषिक (उत्कृष्ट वाङ्मयमूल्य)**
**'नागरिक'/मुग्धा देशपांडे/मीनल प्रकाशन**
एक सजग नागरिक या भूमिकेतून लिहिलेला हा ११ विचारप्रवर्तक लेखांचा संग्रह आहे. लेखिकेला अनेक प्रश्न पडत आलेले आहेत. त्या प्रश्नांची उत्तरं शोधण्याचा प्रयत्न या लेखांमधून केल्याचं दिसतं. महानगर, पिंजरा आणि पक्षी, अगतिक, अंतर, भविष्य, शाश्वत, नागरिक अशा काही प्रश्नाभिमुख शीर्षकांमधून समस्यांचं स्वरूप लक्षात येतं. 'इतिहास काय सांगतो आपला? सर्वच धर्मांच्या समाजातील वाटा एका मूलभूत शाश्वत सत्याकडे घेऊन जाणाऱ्या असतात. आदर्श समाज निर्माण होण्यास विलंब लागल्यास अडथळे होण्यास कारणीभूत, जबाबदार कोण? चिमूटभर भ्रष्टाचारी की पसाभर निष्क्रिय सर्वसामान्य नागरिक?' शीर्षककथेच्या निमित्ताने मांडलेले हे प्रश्न अंतर्मुख करतात.



■ **अरविंद वामन कुलकर्णी पारितोषिक (उत्कृष्ट कवितासंग्रह)**
**'परतीचा रस्ता नाहीय'/श्रीधर नांदेडकर/पॉप्युलर प्रकाशन**
सुरुवातीला आत्मकेंद्री असणारी नांदेडकरांची कविता या संग्रहात मात्र वास्तवकेंद्री बनली आहे. नांदेडकर हे महत्त्वाचे समकालीन कवी आहेत. ८२ कविता असणारा हा संग्रह आहे. सर्वच

कविता काळजाला भिडण्याऱ्या, कवीचा भावनिक उद्रेक अनावर करणाऱ्या, सभोवतालच्या प्रतिकूल काळाशी अथकपणे लढणाऱ्या, विझलेपणाच्या मशालीतून बाहेर पडू पाहणाऱ्या. असे तऱ्हेतऱ्हेचे भावाविष्कार घेऊन येणाऱ्या या कविता. नांदेडकरांमधला कवी म्हणतो,

'मी कवितेच्या जंगलात आलोय
आणि परतीचा रस्ता मिटून गेलाय.'



- **वि. वि. बोकील पारि. (बालसाहित्य)**

**गद्य - 'बालजगत'/रामकृष्ण अघोर/सुविद्या प्रकाशन**

या पुस्तकातील लेख आशय, विषय, मांडणी आणि परिणाम हे सर्व निकषांमध्ये चपखल बसणारे आहेत. यात पर्यावरण कथा, चातुर्यबोध कथा, धाडसकथा अशा बालकुमार वाचकांना आवडणाऱ्या कथा आहेत. प्रत्येक कथेच्या आशयानुसार एका वाक्यात तात्पर्य काढले आहे. या तात्पर्यामुळे मुलांच्या मनावर चांगले संस्कार रुजतील अशी आशा आहे.



**पद्य - 'बाप्पाशी गप्पा'/नयना राजे/मधुराज पब्लिकेशन**

गणपती, शंकर, कृष्ण अशा सर्व देवांची ओळख कवितेतून गुंफली आहे. बाप्पांशी गप्पा मारता मारता तो कसा आहे याचे संस्कार मुलांवर रुजतात. बाप्पा एकदा शाळेत येऊन बसतो. तिथले गणित, भूगोल, शास्त्र असले विषय ऐकून तो घाबरून पळूनच जातो. एका कवितेत आजी देवाची पूजा करताना, नैवेद्य दाखवताना दिसते. ते बघणारं छोटं मूल त्यातून संस्कार घेतं. सहजसुंदर, पटकन पोहोचणारं, मुलांना भावणारं हे काव्य आहे.



- **डॉ. अंबादास दिगंबर माडगूळकर पारितोषिक (सामाजिक आशय)**

**'हरवलेले बालपण'/लक्ष्मीकांत देशमुख/मेहता प्रकाशन**

लेखक प्रशासकीय अधिकारी असल्याने ते जास्तीत जास्त समाजाभिमुख असतात. त्यातून त्यांना दिसणाऱ्या भेडसावणाऱ्या एका प्रश्नावर त्यांनी कादंबरी लेखन केलं आहे.

'बालकामगारांची समस्या' हा या कादंबरीचा विषय आहे. भारतात कायदे होतात पण त्यांचं पालन होत नाही. केंद्र शासनाने शिक्षणाचा अधिकार दिल्यानंतर अनेकांना वाटलं, की येत्या काही वर्षांत एकही मूल शाळाबाह्य राहणार नाही; पण प्रत्यक्षात तसं न झाल्याने कित्येक मुलं आपलं बालपण हरवून बसलीत. ही कादंबरी समाजपरिवर्तनातल्या लढ्यातल्या बालमजुरी निर्मूलनासाठी काम करणाऱ्यांच्या संघर्षाचा विचार करायला लावणारी आहे. लेखकाने ती सहवेदकतेने लिहिली आहे. आज जसं युरोप व अन्य काही देशांतून बालमजुरांचं समूळ उच्चाटन झालंय, तसं भविष्यात एक दिवस भारतातूनही होईल. असा आशावाद लेखकाने कळकळीतून व्यक्त केला आहे.



- **शरद्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (लक्षवेधी साहित्यग्रंथ)**

**'कालजयी कुमार गंधर्व'/कलापिनी कोमकली, डॉ. रेखा इनामदार-साने/राजहंस प्रकाशन**

सत्त्व आणि स्वत्व यांच्या शोधार्थ समर्पित केलेला हा ग्रंथ मुखपृष्ठापासूनच लक्ष वेधून घेणारा आहे. कुमार गंधर्वांसारखा प्रतिभावंत कलावंत आयुष्यभर प्रयोगशील राहून कलाविष्कार करत राहिला. काळावर मात करून संगीताच्या क्षेत्रात अभिजात कर्तृत्व गाजवणाऱ्या कुमार गंधर्वांच्या कर्तृत्वाचं मूल्यांकन या ग्रंथातील लेखांद्वारे वाचकांसमोर आलं आहे. कुमारजींच्या चरित्रापेक्षा त्यांच्या गाण्याचं अनन्यसाधारणत्व अधोरेखित करण्याचा प्रयत्न यातून ठळकपणे जाणवतो. पु. ल. देशपांडे, यू. आर. अनंतमूर्तींपासून सत्यशील देशपांडे, श्रुती सडोलीकर यांच्यासारख्या तरुण गायकांपर्यंत अनेकजण या रसराग मांडणीत सामील झाले आहेत. कुमार गंधर्वांच्या कलासाधनेचं संचित या ग्रंथरूपातून पुढच्या पिढ्यांपर्यंत पोचवण्याचं प्रयोजन स्तुत्य आहे.

- **शरद्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (प्रबंधलेखन)**

**प्रबंध - 'अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील गावगाडा आणि जातिवास्तव'/सहदेव शरद चव्हाण**




या प्रबंधातील अभ्यासविषयाची पाच प्रकरणांत मांडणी करण्यात आली आहे. पहिल्या प्रकरणात साहित्याचा समाजशास्त्रीय अभ्यास ही संकल्पना उलगडून दाखवली आहे. 'अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील गावगाड्या'चा परामर्ष दुसऱ्या प्रकरणात, तर तिसऱ्या प्रकरणात 'अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील जातिवास्तव' अधोरेखित केलं आहे, तर पुढे 'अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्यातील स्त्रीजीवनाचे चित्रण' कसं आहे यावर विवेचन करण्यात आलं आहे.



- **सागर / वसुंधरा शिरोळे पुरस्कृत डॉ. पुष्पा शिरोळे पारितोषिक (आहार/आरोग्य)**
  **'डॉक्टर... एक विचारू?'/डॉ. उपेंद्र किंजवडेकर/राजहंस प्रकाशन**

या पुस्तकात बालआरोग्यसंदर्भातील अनेक प्रश्नांचं, त्यातल्या शंकांचं निरसन केलं आहे. अगदी 'तान्ह्या बाळाला अंघोळ कशी घालावी?' इथपासून 'लसीकरणाचे महत्त्व' एवढी या पुस्तकाची व्याप्ती आहे. 'बाळाला आय.सी.यू.मध्ये का ठेवायचे?' यासारख्या शंकेला उत्तर देताना केवळ 'प्रश्नाला उत्तर' असा लेखकाचा रोख नसून 'विशेष दक्षता कक्षा' (आय.सी.यू.)विषयीचे समज-गैरसमज नेमके कोणते आहेत? इतर वॉर्डपेक्षा या 'दक्षता कक्षांचे महत्त्व किती आहे' याची चर्चा डॉक्टरांनी द पुस्तकात केली आहे. अत्यंत सोप्या भाषेत बालआरोग्याची माहिती या पुस्तकातून वाचकांसमोर येते.




- **मालिनी शिरोळे पारितोषिक (स्तंभलेखन)**
  **'गल्लत, गफलत, गहजब'/राजीव साने/राजहंस प्रकाशन**

'समर्थनात्मक मूल्यविचारांची चिकित्सा' हे या लेखसंग्रहाचं मुख्य आशयसूत्र आहे. शिक्षण असो की प्रादेशिक अस्मिता, आर्थिक प्रश्न असो वा सामाजिक-राजकीय आंदोलनं, अनेक क्षेत्रांमधल्या वेगवेगळ्या समस्या आपल्याला घेरून उभ्या आहेत. सेक्युलर की कम्युनल, समता की सर्वोदय असे अनेक प्रश्न उभे असतात. त्या प्रश्नांची उत्तरं शोधायची आहेत. या पुस्तकाचे लेखक राजीव साने या शोधाला एक नवं वळण देणारी, समस्यांकडे पाहण्यास नवी दृष्टी देणारी उजवेपणाची समंजस भूमिका घेऊन ती मांडत आहेत. आणि या भूमिकेतून प्रचलित दुराग्रह व गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न म्हणजेच हे पुस्तक.




- **ॲड. त्रिंबकराव शिरोळे पारितोषिक (ललित गद्य)**
  **'एक उलट... एक सुलट'/अमृता सुभाष/राजहंस प्रकाशन**

लेखिकेच्या भूमिकेतून अमृताने तिच्या मनातल्या विचारमंथनांची अन् आयुष्यातल्या अनुभवसरींची अक्षरबद्ध केलेली ही वीण- एक उलट... एक सुलट. बालपणीची स्मरणे, अभिनेत्रीपणातून आलेले अनुभव आणि काही प्रासंगिक विषय असं पुस्तकाचं स्वरूप आहे. 'लोकसत्ता'मध्ये प्रसिद्ध झालेल्या स्तंभलेखनाचं हे संकलन आहे. विषय कोणताही असला तरी तो संवेदनशीलतेने अनुभवताना त्याच्या गाभ्यापर्यंत जाण्याचा प्रयत्न लेखिकेने सतत केला आहे. या लेखांच्या माध्यमातून अभिनेत्री ते लेखिका असा प्रवास मनाला सुखावतो. लेखिका म्हणून अमृताचं व्यक्तिमत्त्व ठसठशीतपणे उभं राहावं एवढं सामर्थ्य या लेखनातून दिसतं.



- **माधुरी वैद्य पुरस्कृत श्रीवत्स प्रकाशनतर्फे पारितोषिक (संपादित ग्रंथ)**
  **'स्त्रीलिखित मराठी कथा' / संपादन- डॉ. अरुणा ढेरे/पद्मगंधा प्रकाशन**

या ग्रंथात एकूण अकरा महत्त्वाच्या कथालेखिकांच्या मुलाखती आणि त्यांची निवडक कथा समाविष्ट केली आहे. कमल देसाईपासून मोनिका गजेंद्रगडकरांपर्यंत तीन पिढ्यांतील लेखिकांशी संवाद साधताना त्यांना खोलवर जाणून घेण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. ग्रंथाला दस्तऐवजाचं परिमाण लाभलेलं दिसतं. एकंदरीत समकालीन कथेबद्दल वाचकांची जाणीव समृद्ध करणारं हे चिंतन मराठी समीक्षाविश्वात भर टाकणारं आहे. या ग्रंथाला संजय आर्वीकर यांची ५७ पृष्ठांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना लाभली आहे.

**नंदा सुर्वे**
भ्रमणध्वनी : ९४२३५३३२४०












## निवडक नवे

# संगतीचं महत्त्व अधोरेखित करणारी कादंबरी




- सं गच्छध्वम्
- ल. सि. जाधव
- सुविद्या प्रकाशन
- पृष्ठे : १८८
- मूल्य : १७० रुपये

भारतीय समाजव्यवस्था ही अनाकलनीय गुंतागुंत आहे. हा गुंता जितका सोडवायला जावं तितका तो जटिल होत जातो. 'सं गच्छध्वम्' या कादंबरीमधून ल. सि. जाधव यांनी त्याची उकल करण्याचा प्रयत्न केला आहे. ल. सि. जाधव हे नाव मराठी साहित्यविश्वाला आता अपरिचित नाही. त्यांचं 'होरपळ' हे आत्मकथन आणि 'सुंभ आणि पीळ' ही कादंबरी राज्य सरकारच्या उत्कृष्ट साहित्य पुरस्कारांनी गौरवली गेली आहे.

सोलापूरच्या मातंगवस्तीत बालपण गेल्याने दैन्य, दारिद्र्य, भूक, जातीयवादाचा वणवा, भेदाभेद त्यांच्या प्रत्ययाला आलं आहे. दलितांची, शूद्रांची भूकच हजारो वर्षं या पाताळयंत्री आणि चाणाक्ष व्यवस्थेने आपल्या कब्जात बंधक ठेवली होती. भूक ही माणूसपण, अस्तित्व आणि अस्मिताच नष्ट करून टाकते असं जाधव म्हणतात. डॉ. बाबासाहेब आंबेडकर नावाचं वादळ, पुढे मराठवाडा विद्यापीठाची नामांतर चळवळ, दलित पँथरची निर्मिती या सामाजिक घडामोडी त्यांनी कधी अलिप्तपणे तर कधी प्रत्यक्ष सहभागाने अनुभवल्या आहेत. स्वातंत्र्योत्तर काळात सरकारी पातळीवरून विविध महामंडळांची स्थापना आणि वंचित लाभार्थी, समाजकल्याणातून साधलं जाणारं स्वार्थांध पुनरुत्थान यामुळे ते व्यथित झाले. हे सगळं त्यांच्या आत कुठे तरी मुरत होतं, झिरपत होतं आणि सेवानिवृत्तीनंतर त्याला लेखनाच्या रूपाने व्यक्त होण्यासाठी वाट मिळाली. आत्मचरित्र आणि ही चौथी कादंबरी अल्पावधीतच त्यांच्याकडून लिहून झाली त्यामागे ही खदखद होती, वेदना होती, प्रकट होण्याची आस होती. 'सं गच्छध्वम्' या कादंबरीतून जाधव यांच्यातल्या आगीचं जसं दर्शन घडतं, तसंच समाजाकडे पाहण्याची स्वच्छ, निकोप आणि संगतीने पुढे जाण्याची समंजस व प्रगल्भ भावना दिसते.

सोनपूरचं बुद्धनगर, भिकाभाऊ, त्याची आई सोनाई, तरुण विधवा भावजय आदिका, भाऊ सावत्या आणि त्याची पत्नी सरसा या पात्रांतून त्यांनी आंबेडकर चळवळीतील लढवय्या कार्यकर्त्यांचं कुटुंब चितारलं आहे व त्यातील ताणेबाणे, त्यांचा संघर्ष दाखवला आहे. महानगरपालिकेत रस्ता झाडायचं काम असलेल्या आदिकेला मुकादम असलेल्या तिच्याच बाबुशा या नातेवाइकाकडून झालेल्या विनयभंगाला तोंड द्यावं लागतं. त्याच्या शरीरसुखाच्या मागणीचा तीव्र प्रतिकार केल्याने आदिकाला मेलेली, फुगलेली कुत्री ओढत नेऊन टाकायचं काम तो करायला लावतो आणि दुसरीकडे भिकाभाऊ उमरगा, औरंगाबाद, उस्मानाबाद, लातूर असं महाराष्ट्रभर फिरत दलितांवर होणारा अन्याय दूर करण्यासाठी धावपळ करत असतो. हा विरोधाभास जाधव यांनी निरनिराळ्या प्रसंगांतून नेमकेपणाने दाखवला आहे. घराकडे दुर्लक्ष झालं, तरी 'बाबासाहेबांच्या कामाला फिरत राहणारा भावड्या' असा कौतुकाचा भाव त्याच्या कुटुंबीयांच्या मनात असतो.

भिकाभाऊच्या चळवळीत काम करणारे वनिता कांबळे, चंदू कुचेकर, मोहन भंडारे, प्रवीण प्रधान, तुळजाराम गायकवाड, प्रा. तुकाराम रणदिवे हे साथी ज्या बुद्धनगरात राहत असतात तिथला गलिच्छ वस्ती सुधारणा हा महापालिकेचा फलक त्यांना अस्वस्थ करत असतो. बुद्धविहारात एकीकडे भन्ते सारीपुत्तांकडून मनःशांतीची दीक्षा घ्यायची, त्याच वस्तीला गलिच्छ म्हणवून घ्यायचं हे त्यांना खटकत असतं. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयंतीच्या मिरवणुकीत दारू पिऊन, धुंद होऊन नाचणारी तरुणाई आंबेडकरांचे विचार आचरणात आणत नाहीत याची खंत भिकाभाऊला आहे. पंचशीलाची प्रतिज्ञा रोज म्हणून आपलं कर्तव्य संपत नाही, असं तो म्हणतो.

गुन्हेगारीचा मार्ग सोडून इमानदारीने जगण्यासाठी तयार झालेल्या पारधी समाजाचा आपल्या सोयीसाठी खुनखराब्याकरिता वापर करून घेणारा आमदार दिलीपराव साबळे हे आजचं वास्तवच आहे. त्याच्या वर्चस्वाला हादरा देऊ पाहणाऱ्या दलित नेत्याची हत्या पारध्यांकडून करवून घेऊन कटकारस्थानं करायची आणि पुनर्वसनाच्या नावाखाली स्वतःच्या शेतात आश्रय देण्याचं नाटक करून पारधी समाजाला मूळ प्रवाहात येण्यापासून रोखण्याचं षड्यंत्र कसं केलं जातं त्याची हकीकत वाचली की वाचकाच्या अंगावर शहारा आल्याशिवाय राहत नाही. पारध्यांचं राहणीमान, त्यांची भाषा, त्यांची नावं यांचे बारकावे जाधव यांच्या जाणकारीचा प्रत्यय देतात.

पोटुशी असलेल्या तानीला नवव्या महिन्यातही तोडणीचं काम करावं लागतं. ते करतानाच ती बाळंत होते. पहिलं मूल पोटातून बाहेर आल्यानंतर तिच्याबरोबर काम करणारी

संगावाई विळ्याने नाळ कापून टाकते. पण तानीच्या पोटात जुळं असतं. ते दुसरं मूल बाहेर येऊ शकत नाही. त्यामुळे उसाच्या फडातच तिचा अंत होतो. या घटनेतून निर्माण झालेला पेच भिकाभाऊ सोडवतो. पण ज्या पद्धतीचं जगणं या कामगार महिलांच्या वाट्याला आलेलं आहे त्याचं वर्णन वाचून मन सुन्न होऊन जातं. ब्राह्मणकन्या आणि दलित तरुण यांच्यातील प्रेमप्रकरणातून उद्भवलेलं अॅट्रॉसिटीचं प्रकरण, त्यातून दोन्ही समाजांतील ताण-तणाव, ते सोडवण्यासाठी चाललेले प्रयत्न आणि शेवटी भिकाभाऊने केलेली मध्यस्थी हा प्रसंगही भावना हेलावणारा आहे. शिकलेले दलित आपल्या अशिक्षित रक्ताच्या नात्यालाही कसं विसरतात तेही प्रा. शिंदे दांपत्याच्या वर्तणुकीतून 'सं गच्छध्वम्'मधून वाचायला मिळतं.

आश्रमशाळांमधून लाटलं जाणारं, मूकबधिर शाळांमध्ये जास्त पट दाखवून उकळलं जाणारं सरकारी अनुदान या प्रसंगांमधून ल. सि. जाधव यांनी भ्रष्टाचाराने सडलेल्या व्यवस्थेवर कोरडे ओढले आहेत.

'सं गच्छध्वम्' ही कादंबरी दलितांच्या जगण्याचं आजचं वास्तव मांडते, त्याचप्रमाणे सडलेल्या- किडलेल्या व्यवस्थेचं दर्शन घडवते. पैसा हेच सर्वस्व मानून जगणाऱ्यांचं फोलपण दाखवते, तसे नातेसंबंधांमधील हळुवार, नाजूक आणि हृदयस्पर्शी घटना-प्रसंगांनी हलवूनही टाकते. पाली साहित्यातील तिपिटक, धम्मपदं, पंचशील आणि बौद्ध धर्माचरणाचं वेगळेपणही जाधव यांनी यथायोग्य दाखवलं आहे. भिकाभाऊची आई सोनाई वाकळ शिवत असल्याचं एक प्रतीक खूप छान रीतीने त्यांनी मांडलं आहे. अठरापगड जाती-धर्मांचे लोक, त्यांच्या समस्या आणि त्यावर उपाय करून ते जोडण्याचं काम करणारा भिकाभाऊ आणि घरातील चिंध्यांची ठिगळं लावून सुरेख वाकळ शिवणारी सोनाई यांचं रूपक सुखावणारं आहे. एकूण समाजाचं वास्तव दाखवताना सगळे मिळून जाण्यात, सुसंवादात आणि एकमेकांना समजून घेऊन एकदिलाने वागण्यातच माणसाचं उज्ज्वल भवितव्य दडलेलं आहे, असा निर्वाळाही ही कादंबरी देते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांप्रमाणे वर्तन करण्याची आज किती गरज आहे ते पटवून सांगणारी ही कादंबरी आहे. दलित साहित्यावर केला जाणारा आक्रस्ताळेपणाचा आरोप फेटाळणारी जाधव यांची संयत भाषा; दलित किंवा मागास म्हणून विनाकारण वेगवेगळ्या मांडल्या जाणाऱ्या चुली उपयोगाच्या नाहीत, सारा समाज एकसंघ राहिला पाहिजे आणि माणसांची मनं सोनाईच्या वाकळीप्रमाणे जोडली पाहिजेत, असा एक आशावाद जागवणारी, मराठी साहित्यात वेगळा विचार मांडणारी ही कादंबरी ल. सि. जाधव यांनी लिहिली आहे. ♦

रजनीश जोशी
भ्रमणध्वनी : ९८५००६४०६६

# परिवर्तनाची भूमिका मांडणारी कविता



- 'उगवेल का अशी एखादी पहाट?'
- अनुवाद : किशोर मेढे
- सायन पब्लिकेशन
- पृष्ठे : १३५
- मूल्य : १७० रुपये

कवी किशोर मेढे यांनी 'उगवेल का अशी एखादी पहाट' या कवितासंग्रहात तिबेटमधील निर्वासित कवींच्या इंग्रजी कवितांचा मराठीत केलेला अनुवाद आहे. चीनच्या मायावी शक्तीच्या पाशातून आपला तिबेट कसा स्वतंत्र होईल, मातृभूमीत पुन्हा स्वातंत्र्यात कसे जगता येईल; जीवन जगण्याचा संघर्ष, आत्मसन्मान आणि मातृभूमीच्या प्रेमासोबत भोगलेले दुःख, दारिद्र्य आणि वेदनांचा हुंकार कसा थांबवता येईल, अशा काही प्रश्नांची चर्चा, चिंतन आणि उलगडा करणारी ही संघर्षमय कविता आहे. हा संघर्ष, ही वेदना जाणून घेण्यासाठी किशोर मेढे यांनी दलाई लामा आणि हिमाचल प्रदेशातील धरमशाला येथील निर्वासितांच्या वसाहतीला भेट दिली. बौद्ध धम्म आणि संस्कृती व साहित्याचा अभ्यास करण्याची जिद्द त्यांना तेथे घेऊन गेली. नेपाळ, तिबेट आणि उत्तरांचलच्या प्रदेशात चीनच्या सर्वच प्रकारच्या अतिक्रमणामुळे मायभूमीपासून विभक्त होणाऱ्या मूळच्या नागरिकांच्या अस्तित्वाचे प्रश्न या निमित्ताने कवी मेढे यांनी स्वतः अनुभवले, त्यांचे साहित्य वाचून काढले. त्यातल्या निवडक नऊ कवींच्या एकूण ३३ कवितांचा इंग्रजीतून मराठी अनुवाद केला. त्याचा प्रत्ययकारी अनुभव म्हणजे 'उगवेल का अशी एखादी पहाट?' हा कवितासंग्रह आहे.

आपली काव्यप्रेरणा आणि अनुवादाची भूमिका मांडताना ते लिहितात, 'असंख्य प्रश्न संवेदनशील मनामध्ये विचारांचं काहूर माजवितात. या प्रश्नांची उत्तरं शोधण्याची जबाबदारी फक्त तिबेटी निर्वासितांचीच नाही तर संपूर्ण समाजाची आहे.... अशा प्रतिकूल परिस्थितीत हे निर्वासित बांधव कुठवर तग धरतील, हा खरोखरच जागतिक चिंतेचा विषय आहे. त्यांचा हा आकान्त संपूर्ण जगासमोर यावा, त्याची दखल घेऊन कायमस्वरूपी उपाय शोधला जावा, हा एकमेव हेतू डोळ्यांसमोर ठेवून या काव्यसंग्रहाची निर्मिती केली आहे.'

मूळ तिबेटी कवींच्या इंग्रजीतील हे विचारविश्व, भावना, वेदना, आणि समाजपरिवर्तनाची असोशी इत्यादींचा मराठी वाचकांना परिचय करून देताना कवी किशोर मेढे यांनी केवळ

अनुवादासाठी अनुवाद न करता ती एक स्वतंत्र 'अनुसर्जन' करण्याची प्रक्रिया आहे याचे प्रत्यंतर दिल्याचे लक्षात येते. म्हणून कवितासंग्रहातील भोवताल, भावविश्व आणि वर्तमान हे समकालीन जाणिवांच्या प्रतिबिंबाचे प्रत्ययकारी दर्शन घडवणारे आहे. कवी मेढे या सर्व प्रश्नांशी भिडतात, भोगलेल्या संवेदनशील वेदना-दुःखाचे साक्षीदार होऊन ते मांडण्याचा प्रयत्न करतात, हे या कवितासंग्रहाचे खास वैशिष्ट्य म्हटलं पाहिजे.

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांची प्रस्तावना त्यासाठी लाभलेली असून ती अभ्यासपूर्ण आहे. या कवितासंग्रहातील नऊ मानकरी कवी म्हणजे येंझीन सुंड्यू, सालटिम गिमा शाकाबपा, ल्हासंग सिरिंग, भुचुंग डी. सोनम, इनझिंग रिगडाल, गॅलपो सिरिंग, गोडूप पाल्जोर, जेनडून चोफेल, नोरवू झांगपो असे आहेत.

'मी दमलोय चाळीस वर्षांपास्नं,
घाणीच्या साम्राज्यात, रस्त्याच्या कडेला स्वेटर विकताना'
(पृ.३७)

'माझ्या माथ्यावर भुवयांच्या मधोमध
ठ कोरलाय, असं माझी शिक्षिका म्हणाली.
मी खरवडलं आणि घासून काढलं,
तेव्हा लक्षात आलं की
तिथे दुःखाचा लाल चट्टाच पडलाय...
रँगझेन म्हणजे स्वातंत्र्य' (पृ. ४७)

'मी तिबेटी आहे परंतु तिबेटचा नाही
किंबहुना नव्हतोच कधीही
पण स्वप्नं बघतोय तिथेच मरायची (पृ. ५१)
सफरचंद आणि संत्री एकोप्याने नांदू शकतात,
मतभेदात नाही
तिबेटी आहे मी, चिनी नाही, म्हणून तुलनाच नको
सफरचंदाची संत्र्याशी' (पृ. ६४)

अशा काही मोजक्याच ओळींतून व्यक्त होणारी वेदना, दुःख, पारतंत्र्य आणि शोषणादी अत्याचारांचा प्रत्यय देणारी ही कविता आहे. मूळ तिबेटी कवींचे हे दुःख आणि त्यांचा विद्रोहसंघर्ष तसेच सामाजिक परिवर्तनाची आंतरिक ओढ कवी किशोर मेढे यांनी तादात्म्यभावातून टिपली आहे.

आपल्या भूमीतून दूर लोट लेल्या, मातृभूमी आणि आपली माणसं-संस्कृतीपासून परागंदा झालेल्या लोकांची ही व्यथावेदना आहे. बौद्ध तत्त्वज्ञान आणि शांतता-अहिंसेचा मार्ग हीच जीवनशैली असलेल्या तिबेटच्या नागरिकांना चीनच्या अत्याचाराची जी झळ पोहोचली आहे त्याचे प्रत्ययकारी दर्शन या कवितेतून घडते.

'लोक म्हणतात, आम्ही असावं शांतताप्रिय आणि अहिंसावादी
म्हणून मी माफ केलंय माझ्या शत्रूला
परंतु कधी कधी मला वाटतं
मी विश्वासघात केलाय माझ्या बापाचा' (पृ. ५७)

पारतंत्र्याची जखम भळभळ वाहणारी असून त्यातून ठसठसती वेदना वाहतानाही बौद्ध तत्त्वज्ञानाची मूलभूत बैठक या कवितेतून व्यक्त होते. स्वातंत्र्याची ओढ, मानवतेची आणि अहिंसेची संगत, अन्याय-अत्याचाराच्या विरोधात बंड व क्रांतीची भाषा, मातृभूमीचे प्रेम आणि चीनची निर्भर्त्सना, शाश्वतमूल्ये आणि नैतिकतेची ओढ असलेली ही कविता मराठीतून वाचकांना अंतर्मुख करेल अशीच आहे.

'माझा देश ताब्यात घ्यायला आलात तर मात्र मी लढेन
माझी राख हवेत मुक्त उडेस्तोवर...' (पृ.६१)
'चिनी राजवटीचा अंत करून
माझी मातृभूमी आणि स्वातंत्र्य
मी पुन्हा परत मिळवू शकतो
हो, हे मी करेनच!' (पृ. ६७)
'साम्यवादी चीन जेव्हा सांगतो की मी सुखी आहे
मी जाणतो... मी दुःखी आहे
कोण खरं सांगतो
हे सर्वस्वी सांगणाऱ्यावर अवलंबून आहे.' (पृ. ८१)

अशा या काही कवितांतून तिबेटी कवींचं 'स्वातंत्र्याच्या दिशेने कसे जाता येईल, क्रांती कशी घडवता येईल, आपलं अस्तित्व कसं टिकवता येईल; मानवता, शांतता, अहिंसा कशी प्रस्थापित करता येईल' याविषयीचं चिंतन आणि चिंता प्रकट झालेली आहे. बौद्ध तत्त्वज्ञानाचा आणि साम्यवादाचा स्वीकार करूनही चीन हे आधुनिक काळात एक शक्तिशाली राष्ट्र म्हणून उभं राहताना किती भयानकतेच्या पातळीवर येऊन ठेपलेला देश आहे याची पार्श्वभूमी या कवितेतून स्पष्टपणे उभी राहते.

कवी 'इनझिंग रिगडाल' यांची 'मी हत्तीला विचारलं' ही कविता प्रतिमा-प्रतीकांच्या भाषेतून एखाद्या बोधक थेसारखी पंचतंत्रातल्या गोष्टीसारखी 'मानवतेचा' मागोवा घेताना दिसते. निर्बुद्ध माणसालाही जे कळतं असं अंतिम सत्य काय आहे? 'तू कोणाला भितोस?' या शाश्वताचा आणि चिरंतन सत्याचा मागोवा घेणारी ही कविता आहे. 'हत्ती,'माकड' आणि 'गाढव' ही या विचारप्रक्रियेतील प्रतीकं आहेत.

मी हत्तीला विचारलं, 'तू कोणाला भितोस?'
तो म्हणाला, 'माझ्या मालकाला, ज्याने माझे दोन्ही सुळे विकलेत'.
मी माकडाला विचारलं, 'तू कोणाला भितोस?'
ते म्हणालं, 'माणसाला, ज्याच्याकडे छोटा ढोल असतो
अन् असतो माझ्या नखऱ्यांसाठी चाबूक.'
नंतर मी गाढवाला विचारलं, 'तू रे कोणाला भितोस?'
ते म्हणालं, 'अर्थातच परमेश्वराला!'

वर्चस्ववाद, साम्राज्यवादी विचारसरणीच्या विरोधातील विद्रोह आणि नकाराची तसेच परिवर्तनाची भूमिका मांडणारी ही एकूणच तिबेटी कविता कवी किशोर मेढे यांनी मराठीत अत्यंत सम्यक् भावाने, समर्पक भाषेत मांडली आहे. ◆

डॉ. किसन पाटील
भ्रमणध्वनी : ९८९०६१२२२८







# महाराष्ट्र साहित्य परिषद
# पुणे शहर कार्यवृत्त
## (दि. १ मार्च २०१५ ते ३१ मे २०१५)

### दि. २३ मार्च २०१५

**दिवाळी अंक स्पर्धा - २०१४ पारितोषिक वितरण :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने घेण्यात आलेल्या राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा (२०१४)चा पारितोषिक वितरण समारंभ ८८व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांच्या हस्ते झाला. या वेळी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष सुनील महाजन, स्पर्धेचे निमंत्रक महेंद्र मुंजाळ, परीक्षक डॉ. कीर्ती मुळीक व प्रमोदिनी वडके-कवळे यांची प्रमुख उपस्थिती होती.

या वेळी डॉ. मोरे यांच्या हस्ते अ. स. गोखले स्मृत्यर्थ रत्नाकर पारितोषिक 'विपुलश्री' या दिवाळी अंकाला, चंद्रकांत शेवाळे पुरस्कृत तीन पारितोषिके १) मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक 'महाराष्ट्र टाइम्स' या दिवाळी अंकाला, २) विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक 'उद्याचा मराठवाडा' या दिवाळी अंकाला, ३) शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक 'संवाद' या दिवाळी अंकाला, त्याचबरोबर उत्कृष्ट बालकुमार अंकासाठीचे पारितोषिक 'माऊस' दिवाळी अंकाला प्रदान करण्यात आले. याशिवाय उत्कृष्ट कथेसाठीचे दि. अ. सोनटक्के पारितोषिक 'महाराष्ट्र टाइम्स' दिवाळी अंकातील नितीन रिंढे यांच्या 'पुस्तकांचं घर' या कथेला, तर उत्कृष्ट ललित लेखाचे अनंत काणेकर पारितोषिक 'साहित्य' दिवाळी अंकातील रश्मी कशेळकर यांच्या 'गणपतीची शाळा' आणि 'साहित्यप्रेमी' दिवाळी अंकातील ल. म. कडू यांच्या 'रोहिणीचा पाऊस' या लेखांना विभागून प्रदान करण्यात आले. या वेळी डॉ. सदानंद मोरे, डॉ. कीर्ती मुळीक, प्रमोदिनी वडके-कवळे, नितीन रिंढे, किशोर पाठक यांनी मनोगत व्यक्त केले.

### दि. १० एप्रिल २०१५

**ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन :**

या निमित्ताने कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या पुतळ्यास पुष्पहार अर्पण करून आदरांजली वाहण्यात आली. या वेळी डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, डॉ. कल्याणी दिवेकर, दीपक करंदीकर आदी उपस्थित होते.

### दि. १६ एप्रिल २०१५

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती व्याख्यान :**

या निमित्ताने ज्येष्ठ पत्रकार-संपादक अरुण खोरे यांचे 'डॉ. आंबेडकरांची ज्ञानसाधना' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले, तर सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले.

### दि. २२ एप्रिल २०१५

**मधुकर केशव लेले स्मृति व्याख्यान :**

या निमित्ताने डॉ. सी. जी. देशपांडे यांचे 'मानवी वर्तन' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी डॉ. वि. वि. घाणेकर यांनी लेले यांच्या आठवणींना उजाळा दिला. प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक व दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

### दि. ६ मे २०१५

**कृष्ण मुकुंद उजळंबकर स्मृती पुरस्कार :**

या कृष्ण मुकुंद उजळंबकर स्मृती पुरस्कार मकरंद साठे यांच्या 'मराठी रंगभूमीच्या तीस रात्री- एक सामाजिक व राजकीय इतिहास' या ग्रंथासाठी ज्येष्ठ नाट्यकर्मी समर नखाते यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. या वेळी डॉ. नलिनी गुजराथी, मोहन गुजराथी, सुधीर व मुकुंद उजळंबकर यांची प्रमुख उपस्थिती होती. मकरंद साठे व समर नखाते यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. माधवी वैद्य यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले, तर डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले.

### दि. ७ मे २०१५

**शं. ना. जोशी स्मृती पारितोषिक वितरण कार्यक्रम :**

शं. ना. जोशी स्मृती पारितोषिक मंदार लवाटे यांना त्यांच्या 'पुण्यातील गणेश विसर्जन उत्सव : १२१ वर्षांचा इतिहास' या ग्रंथासाठी डॉ. भगवंतराव कुलकर्णी यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले. या वेळी शं. ना. जोशी यांचे कुटुंबीय उपस्थित होते. लवाटे व कुलकर्णी यांनी या वेळी मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रकाश पायगुडे यांनी, तर








सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**दि. १२ मे २०१५**

**पुष्पा पुसाळकर पुरस्कार :**

सुविचार प्रकाशन मंडळ पुरस्कृत पुष्पा पुसाळकर पुरस्कार साहित्य प्रसार केंद्र, नागपूर यांना मारुती चितमपल्ली लिखित 'पक्षिकोश' या ग्रंथाच्या उत्कृष्ट निर्मितीसाठी प्रदान करण्यात आला. मकरंद कुलकर्णी यांनी ज्येष्ठ साहित्यिक राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते तो स्वीकारला. या वेळी प्रकाश पायगुडे, सुनील महाजन, चैतन्य वनहट्टी आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**दि. २६ मे २०१५**

**वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कार वितरण समारंभ :**

ज्येष्ठ लेखिका मंगला गोडबोले यांच्या हस्ते मसापच्या वतीने दिल्या जाणाऱ्या वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कारांचे वितरण करण्यात आले. (पुरस्कार प्रदान केलेल्या सर्व सन्माननीय लेखकांची यादी या अंकात दिली आहे.) या वेळी परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर, कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनील महाजन, कार्यवाह नंदा सुर्वे यांची प्रमुख उपस्थिती होती. मंगला गोडबोले यांचा परिचय डॉ. कल्याणी दिवेकर यांनी करून दिला. गोडबोले यांनी आपले मनोगत व्यक्त केले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी, सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी तर आभार सुनील महाजन यांनी मानले.

**दि. २७ मे २०१५ :**

**मसापचा १०९ वा वर्धापनदिन समारंभ :**

या निमित्ताने कार्यक्रमाच्या पूर्वार्धात दीपक करंदीकर यांच्या गझला व गीतांवर आधारित सर्वोत्कर्ष चॅरिटेबल ट्रस्ट प्रस्तुत 'अक्षरधुनी- अक्षयधुनी' हा कार्यक्रम सादर करण्यात आला. या कार्यक्रमात दीपक करंदीकर, राहुल घोरपडे, राजेश दातार, वृषाली काटकर, विजय उपाध्ये, राजेंद्र इरकर व गोपाळराव लिमये सहभागी झाले होते.

कार्यक्रमाच्या उत्तरार्धात माजी सनदी अधिकारी अविनाश धर्माधिकारी यांच्या हस्ते ज्येष्ठ लेखक रंगनाथ पठारे यांना 'मसाप सन्मान', मधू नेने (वाई) यांना 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार', पद्माकर कुलकर्णी (सोलापूर) आणि श्यामराव पाटील (इस्लामपूर) यांना रत्नाकर कुलकर्णी स्मृत्यर्थ मसाप कार्यकर्ता पुरस्कार, तसेच मसापच्या सासवड शाखेस राजा फडणीस पुरस्कृत उत्कृष्ट शाखेसाठीचा फिरता करंडक प्रदान करण्यात आला.

रंगनाथ पठारे यांचा परिचय महेंद्र मुंजाळ यांनी, अविनाश धर्माधिकारी यांचा परिचय डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी, मधू नेने यांचा परिचय डॉ. कल्याणी दिवेकर यांनी, पद्माकर कुलकर्णी यांचा परिचय ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी, श्यामराव पाटील यांचा परिचय वृषाली आफळे यांनी तर सासवड शाखेचा परिचय सुनील महाजन यांनी करून दिला.

या वेळी रंगनाथ पठारे, मधू नेने, पद्माकर कुलकर्णी, श्यामराव पाटील, रावसाहेब पवार यांनी मनोगत व्यक्त केले. अविनाश धर्माधिकारी यांनी आपले विचार मांडले, तर डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रकाश पायगुडे यांनी, सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी, तर आभार सुनीताराजे पवार यांनी मानले.

◆

## शाखा कार्यवृत्त (दि. २८ डिसेंबर २०१४ ते ३१ मे २०१५)

**चाळीसगाव शाखा**

**१) दि. १७ जानेवारी २०१५ :** प्रा. मिलिंद जोशी यांचे 'विनोदाची दोन शिखरे' या विषयावर व्याख्यान झाले. आई प्रतिष्ठानचे डॉ. विनोद कोतकर या कार्यक्रमाचे प्रायोजक होते.या वेळी प्रदीप देशमुख, भोजराज पुन्शी उपस्थित होते.

**२) दि. १८ जानेवारी २०१५ :** मेघना साने यांचा एकपात्री कार्यक्रम झाला. या वेळी किसन जोर्वेकर, आशालता साळुंखे व प्रायोजक अरुण मावसार उपस्थित होते.

**३) दि. १९ जानेवारी २०१५ :** या दिवशी राजा पटवर्धन यांचे 'जैतापूरचे अणुमंथन' या विषयावर व्याख्यान झाले. आमदार उन्मेश पाटील, प्रायोजक सुभाष करवा, कार्याध्यक्ष डॉ. संतोष मालपुरे, प्रमुख कार्यवाह रामचंद्र गोसावी, गणेश आढाव, अप्पा धुमाळ आदी या वेळी उपस्थित होते.

**४) दि. २७ फेब्रुवारी २०१५ :** या दिवशी मराठी राजभाषा दिनाच्या निमित्ताने डॉ. छाया महाजन यांचे व्याख्यान झाले. या वेळी प्राचार्य तानसेन जगताप, वसंतराव चंद्रात्रे, हर्षल पाटील, डॉ. मालपुरे. रामचंद्र गोसावी आदी उपस्थित होते.

**मंगळवेढा शाखा**

**१) दि. २७ फेब्रुवारी २०१५ :** मराठी भाषादिन व कुसुमाग्रज जयंतीनिमित्त ज्योतिराम फडतरे यांचे कथाकथन; तर संगीता लाड, जगन्नाथ गोडसे, लता माळी, शिवकांता

नखाते, सौरभ शिवशरण यांनी कुसुमाग्रजांच्या निवडक कवितांचे वाचन केले. या वेळी विजयकुमार शिंदे व राहुल भाकरे उपस्थित होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक गणेश यादव यांनी, तर सूत्रसंचालन इंद्रजित घुले यांनी केले. कोषाध्यक्ष राकेश गायकवाड या वेळी उपस्थित होते.

**गुहागर शाखा**

**१) दि. २९ व ३० नाव्हेंबर २०१४ :** दोन दिवशीय जिल्हास्तरीय साहित्य संमेलनाचे आयोजन करण्यात आले. ज्येष्ठ कवी अशोक बागवे संमेलनाचे अध्यक्ष होते. माजी संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या हस्ते संमेलनाचे उद्‌घाटन झाले. या संमेलनात 'कोकणची लोकपरंपरा' हा कार्यक्रम सादर करण्यात आला. इंद्रजित भालेराव, भास्कर वडे, सुहास बारटक्के यांच्या उपस्थितीत 'कवी-लेखक विद्यार्थ्यांच्या भेटीला' हा कार्यक्रम झाला. महेश तेंडुलकर, भालचंद्र दिवाडकर, अलका भाटकर, रश्मी आडेकर यांच्या उपस्थितीत 'गुहागरचा ऐतिहासिक- सांस्कृतिक वारसा' या विषयावर परिसंवाद झाला. इंद्रजित भालेराव यांची मुलाखत अरुण इंगवले यांनी घेतली. निवेदिता कोपरकर, रूपाली अवचरे, भास्कर बडे, श्रीराम दुर्गे यांचे कथाकथन झाले. प्रकाश घोडके यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कविसंमेलनात साहेबराव ठाणगे, सुनील कदम, राष्ट्रपाल सावंत, नारायण लाळे, मंगेश मोरे, रश्मी कशेळकर, हनुमंत चांदुगडे, डॉ. विशाल इंगवले व अस्मिता मराठे यांनी सहभाग घेतला. प्रा. कैलास गांधी यांनी सूत्रसंचालन केले. प्रकाश पायगुडे, जयदेव मोरे, अशोक बागवे, इंद्रजित भालेराव यांच्या प्रमुख उपस्थितीत संमेलनाचा समारोप झाला.

**शिराळा शाखा**

**१) दि. २७ जानेवारी २०१५ :** ज्येष्ठ समीक्षक प्रा. म. द. हातकणंगलेकर व व्यंगचित्रकार आर. के. लक्ष्मण यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा आयोजित करण्यात आली. प्रा. शिवाजीराव कुंभार, एस. एम. पाटील, डॉ. सुमन चव्हाण, प्रा. आर. बी. शिंदे, प्रा. डी. एन. मिरजकर यांची या वेळी उपस्थिती होती.

**२) दि. १५ एप्रिल २०१५ :** प्रा. शिवाजीराव कुंभार यांना श्रद्धांजली वाहणारी सभा आयोजित करण्यात आली होती. आ. मानसिंगराव नाईक, जयसिंग शिंदे, भीमराव गायकवाड, श्रीकांत इनामदार, प्रकाश नवांगुळ, प्रा. विजयकुमार जोखे, डॉ. सुमन चव्हाण, बाबा परीट यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. एस. एम. पाटील यांनी प्रास्ताविक केले.

**डोंबिवली शाखा**

**१) दि. १५ जानेवारी २०१५ :** प्रा. श्यामकांत अत्रे यांचे 'शेक्सपिअरच्या शोकांतिका' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. मीनाक्षी ब्रह्मे यांनी परिचय करून दिला, तर प्रा. मंदार ठाकूर यांनी आभार मानले.

**२) दि. १७ जानेवारी २०१५ :** धनश्री लेले यांचे 'आनंदयात्री-रवींद्रनाथ टागोर' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक मेघना कुलकर्णी यांनी, परिचय ? धनश्री साने यांनी, तर आभार प्रा. मंदार ठाकूर यांनी मानले.

**जुळे सोलापूर शाखा**

**१) दि. २७ फेब्रुवारी २०१५ :** 'संगणक शिक्षण मराठीसंगे' या उपक्रमाचे डॉ. वासुदेव रायते यांच्या हस्ते उद्‌घाटन झाले. अमित कामतकर यांनी या उपक्रमाविषयी माहिती दिली. प्रास्ताविक गिरीश दुनाखे यांनी, तर आभार जयंत रायते यांनी मानले.

**२) दि. २८ फेब्रुवारी २०१५ :** मायमराठी उत्सवानिमित्त 'मराठी बाणा' हा कार्यक्रम व्यंकटेश संगीत विद्यालयाने सादर केला. आयुक्त मा. चंद्रकांत गुडेवार यांना या कार्यक्रमात मानपत्र प्रदान करण्यात आले. गिरीश दुनाखे यांनी मानपत्राचे वाचन केले तसेच आभार मानले.

**३) दि. २९ मार्च २०१५ :** लेखिका डॉ. संगीता व… यांना 'स्व. श्रीनिवास विष्णू रायते गुरुजी बालसाहित्यिक पुरस्कार' गोविंद गोडवोले यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. तसेच कल्लाप्पा खुसलादी यांना आदर्श शिक्षक पुरस्कार देण्यात आला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक सायली जोशी, सूत्रसंचालन प्रशांत जोशी यांनी, तर आभार गिरीश दुनाखे यांनी मानले.

**४) २५ एप्रिल २०१५ :** शाखेच्या वतीने घेण्यात आलेल्या दिवाळी अंक स्पर्धेचा पारितोषिक वितरण कार्यक्रम अभिनंदन थोरात यांच्या प्रमुख उपस्थितीत पार पडला. या वेळी 'आपले छंद', 'पुण्यभूषण', 'चिंतन आदेश', 'निर्मळ रानवारा', 'आक्रोश', 'ऋतुरंग', 'साहित्य', 'ग्राहकहित' ? दिवाळी अंकांना पारितोषिके देऊन गौरविण्यात आले. या वेळी विजय काळम-पाटील, प्रा. ए. डी. जोशी, गोविंद अहंकारी आदी मान्यवर उपस्थित होते.

**भिवंडी शाखा**

**१) दि. २ मार्च २०१५ :** 'संत नामदेव आणि पंजाब' या विषयावर य. ना. तथा बाबूराव कानडे यांचे व्याख्यान झाले. कार्यवाह सुधीर धनवटकर यांनी परिचय करून दिला, तर प्रज्ञा जोशी यांनी आभार मानले.

**२) दि. १६ एप्रिल २०१५ :** श्याम भुर्के यांचे 'विनोदाची मेजवानी' या विषयावर व्याख्यान झाले.

♦

**प्रकाश पायगुडे**, प्रमुख कार्यवाह

कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर** (कार्यवाह)

मराठी साहित्यक्षेत्रात महत्त्वपूर्ण योगदान दिलेल्या खालील लेखकांचं अलीकडेच निधन झालं. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने त्यांना भावपूर्ण आदरांजली.



## डॉ. विलास सारंग

प्रयोगशील कथाकार-कादंबरीकार-समीक्षक
(निधन : १४ एप्रिल २०१५)



## डॉ. यशवंत सुमंत

राज्यशास्त्राचे गाढे अभ्यासक व वैचारिक साहित्यकार.
(निधन : ११ एप्रिल २०१५)



## अशोक पाटोळे

प्रसिद्ध नाटककार.
(निधन : १२ मे २०१५)



## वीणा आलासे

ज्येष्ठ अनुवादक.
(निधन : ३० मे २०१५)



## ॲड. एकनाथ आवाड

दलित व वंचितांसाठी संघर्ष करणारे झुंजार कार्यकर्ते व 'जग बदल घालुनि घाव' या आत्मकथनाचे लेखक.
(निधन : २५ मे २०१५)



## प्रियांका डहाळे

कवयित्री-पत्रकार.
(निधन : ११ मे २०१५)

अनुक्रमणिका



बुक-पो


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : June 2015
Registered with the Register of Newspaper for India under No. 63
Book Pkt. Periodical Category









